# नवभारत

वर्ष २ रें]    जून १९४९    [अंक ९ वा



१ रुपया

# नवभारत



## या अंकांतील जाहिराती

## जाहिरातीचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळां | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | १५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | १२० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥"×५।"

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २.

# औद्योगिक वृत्त-विशेष

( पॅरेमाउंट पब्लिसिटी सिंडिकेट लि., पुणें २ तर्फे प्रकाशित )

**दि भारतीय औषधिशाला लि.** ( अमरावती ) या नांवाचा आयुर्वेदीय औषधें तयार करण्याचा एक मोठा कारखाना १९१३ च्या इंडियन कंपनीज ॲक्टान्वयें स्थापन झाला आहे. कंपनीचें मुख्य कार्यालय, गांधी चौक, अमरावती ( विदर्भ )येथें असून मध्यप्रांत – वऱ्हाडांत अशा प्रकारचा आयुर्वेदीय औषधांचा हा पहिलाच कारखाना आहे. सध्यांच्या परिस्थितीला योग्य असें आयुर्वेदीय औषधासंबधीं संशोधनाचें कार्य करणेंचाहि कंपनीचा उद्देश आहे.

मुंबई सरकारनें **प्लॅस्टिक प्रॉडक्ट्स् ऑफ, इंडिया लि.** (सातारा ) या कंपनीला मोल्डिंग पावडर्सचे उत्पादनाकरतां १।।। लक्ष रुपये कर्जाऊ दिले आहेत.

**दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि.** (कॉमनवेल्थ बिल्डिंग्ज, पुणें २ ) यांनीं रुपये ४२,५०,००० किंमतीचे शेअर्स कंपनीपुढील व्यापक, कार्यक्रमासाठीं विक्रीस काढले आहेत. तसेंच कंपनीनें ७ लक्ष रु. च्या मुदतीच्या ठेवी घेण्याचेंहि ठरविलें आहे.

**नानज ब्रास वर्क्स लि.** (ठाकूरद्वार, मुंबई ) या कारखान्याचे मालास येत असलेली वाढती मागणी पुरी करण्यासाठीं शिवरी येथें कारखान्याचें स्थलांतर करण्यांत आलें असून तेथें जोमांत उत्पादन होत आहे. कोल्हापूर येथील मेडिकल कॉन्फरन्स तसेंच पुण्याच्या नॅशनल सेव्हिंग्जच्या भरलेल्या प्रदर्शनांत कंपनीच्यीं ऑपरेशन टेबल्स, फाउलर बेड्स्, स्टरलायझर्स वगैरे माल ठेवण्यांत आला होता तो तज्ज्ञांना पसंत पडला.

**पॅरॅमाउंट पब्लिसिटी सिंडिकेट लि.** च्या (४८१ शनवार, पुणें २ ) ब्लॉकखात्यानें सुमारें १५००० रु. किंमताचें ब्लॉक्स तयार केले उत्कृष्ट वक्तशीर काम हें पॅरॅमांउट ब्लॉकसच्या लोकप्रियतेचें एक कारण आहे.

मौल्यवान जिनसा, कागदपत्रें वगैरे सुरक्षित जतन करण्यास सेफ डिपॉझिट व्हॉल्टचा उपयोग करण्याची संवय जनतेंत वाढत आहे. **शेंबेकर सेफ डिपॉझिट व्हॉल्ट लि.** ( शेडगे विठ्ठलमंदिराजवळ, लक्ष्मी रोड, पुणें २ ) ही एक लाखाची प्रायव्हेट कंपनी याच कार्यार्थ स्थापन झाली असून तिनें काम सुरू केलें आहे. व्हॉल्टसाठीं इमारतीची रचना विशेष पद्धतीनें करण्यांत आली असून हा उद्योग स्वतंत्रपणें करणारी पुण्यांतील ही पहिलीच कंपनी आहे. सध्यां ८५० लॉकर्सची सोय करण्यांत आली आहे. श्री द. ग. शेंबेकर हे कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत.

---

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष दुसरें
अंक नववा

# नवभारत

जून
१९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच नवभारत कार्यालयांत प्रसिद्ध केलें.

## लेखक-परिचय

[खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचे लेख 'नवभारतां'त पूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्या लेखकांचा परिचय दिला आहे. —का. सं.]

**श्री. बा. मा. दाभाडे,** एम्. ए. — लष्कर (ग्वाल्हेर) येथील चित्र-नृत्यादि ललितकलांचे व्यासंगी लेखक.

**श्री. बा. रं. सुंठणकर,** बी. एजी. —बेळगांव. 'महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य' या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. वि. उ. चांदुरकर,** एम्. ए. बी. कॉम. —वर्धा येथलि गो. स. कॉमर्स कॉलेजमध्यें 'Advanced Banking' (उच्चाधिकोषण) चे प्राध्यापक.

**श्री. र. श. पारखी** — फर्ग्युसन कॉलेजच्या बी. जे. वाडिआ लायब्ररीचे ग्रंथपाल. 'ग्रंथालयशास्त्राचा ओनामा', 'The Decimal and Colon Classifications', 'Reference Service in Libraries' या पुस्तकांचे लेखक.

**प्रा. रा. श्री. जोग**— फर्ग्युसन कॉलेजचे उपप्राचार्य व मराठीचे प्राध्यापक. 'अभिनव काव्यप्रकाश', 'सौंदर्यशोध आणि आनन्दबोध' इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

श्री. केदारनाथ

# सामुदायिक ध्येय

अगदीं प्राथमिक काळांत मनुष्याची काय स्थिति असेल त्याविषयीं कल्पनाहि करणें आपल्याला कठिण आहे. परंतु मनुष्यप्राणी जेव्हांपासून समुदायानें राहूं लागला तेव्हांपासून समुदायाच्या रक्षणाकरितां, धारण-पोषणाकरितां त्याला कांहींतरी नियम करावे लागले असले पाहिजेत; ते नियम तोच त्या काळांतील मानवी धर्म. त्यानंतर समुदायाची संख्या जसजशी वाढत गेली तसतशी मूळ मानवधर्मांतील मानवतेची कल्पना व्यापक होत गेली आहे. व्यापकतेशिवाय समुदायाची वाढ होऊं शकत नाहीं. ती व्यापकता—धारण, पोषण, रक्षण वगैरे बाबतींतील अनुकूलता व क्षमता—त्याचप्रमाणें समाजांत सत्त्वसंशुद्धि म्हणजे सद्गुणांची वृद्धि व शुद्धि वगैरे गोष्टी घडत न राहिल्यास समाज टिकूं शकत नाहीं. त्याकरितां कालमानाप्रमाणें, आवश्यकतेप्रमाणें समाजांत सुधारणा घडवून आणाव्या लागतात. निरनिराळीं आवश्यक साधनें निर्माण करावीं लागतात.

## सामुदायिक जीवनध्येयाचा अभाव

आपल्या देशांत फार प्राचीन काळीं धर्माच्या नांवावर एकदां जी चातुर्वर्ण्यसमाजरचना होऊन गेली तिच्यामागून आपले जागतिक संबंध वाढत येत चालले असतांहि कोणत्याहि प्रकारची व्यवस्थित समाजरचना किंवा जागृतधर्म त्यानंतर शेंकडों वर्षांत अजून निर्माण झाला नाहीं. भारतवर्षाच्या बाहेरील प्रजेचा आपल्याशीं संबंध आल्यापासून आपल्या पडतीला जी सुरवात झाली आहे ती अजून सर्वस्वीं थांबली नाहीं. बाहेरच्या प्रजेशीं टिकाव धरण्याकरितां अवश्य ती सुधारणा आपल्या समाजरचनेंत करून आपला समाज आपण बलशाली व समर्थ बनवूं शकलों नाहीं. नानाप्रकारच्या आपत्ती सोसूनहि आपल्याला जुन्या समाजरचनेचा मोह सुटला नाहीं. 'ईश्वराची इच्छा' व 'प्रारब्धकर्म' या निराशाजनक सिद्धांतांच्या आधारावर अस्ताव्यस्त झालेल्या समाजरचनेंत आपण कसेबसे काळ कंठीत राहिलों आहों. धर्मश्रद्धेच्या नांवावर आपण जडता व पंगुता वाढविली आहे.

पुष्कळच काळ लोटून गेला—आपलें सर्वांचें मिळून एकच असें उदात्त जीवनध्येय आपल्या डोळ्यांसमोर कांहींच राहिलेलें नाहीं. अन्य प्राणी जसे आपआपल्या वैयक्तिक इच्छाकरितां जगतात व आपल्या गरजा पुरविण्याच्या व्यक्तिगत प्रयत्नांत जीवनभर राहतात—जवळ जवळ तीच स्थिति आपण मनुष्य असूनहि आज आपल्या वांट्यास आली आहे. आपणां सर्वांतील मिळून निरनिराळ्या प्रकारच्या शक्ति-बुद्धीनें, निष्ठेनें, कर्तृत्वानें, ऐक्यानें सर्वांस कल्याणप्रद व धन्यता वाटेल असें साध्य आपल्याला साधायचें आहे असा कोणताच सामुदायिक भाव आपल्यांत नाहीं. आपला फार काळ याच ध्येयशून्य स्थितींत गेला आहे. आपल्या समाजांत प्रत्येक काल-भागांत विद्वान् होते, पंडित होते, महान् संतपुरुष होते, धनवान्—ऐश्वर्यवान् होते; एकापेक्षा एक बलशाली, रणशूर धुरंधर योद्धे होते, विलक्षण बुद्धीचे मुत्सद्दी होते. परंतु सर्वांच्या मिळून शक्तीनें व बुद्धीनें प्राप्त करण्याचें असें कोणतेंच सामुदायिक ध्येय आपल्याला नव्हतें. ज्या ध्येयानें सर्वांस धन्यता वाटावी, सर्वांस सारखीच कृतार्थता व गौरव वाटावा व जें सर्वांच्या मिळून परिश्रमाशिवाय, ऐक्याशिवाय एकमेकांकरितां एकमेकांना कराव्या लागणाऱ्या संतोषपूर्वक व मनःपूर्वक स्वार्थत्यागाशिवाय केवळ केवढ्याहि मोठ्या वैयक्तिक पराक्रमानें किंवा

सामर्थ्यानें, त्यागानें किंवा ज्ञानानें, भक्तीनें किंवा साधुत्वानें, धनानें किंवा ऐश्वर्यानें, औदार्यानें किंवा विद्वत्तेनें, शीलानें किंवा सद्गुणानें प्राप्त होणें शक्य नाहीं, असें कोणतेंहि जीवनध्येय आपल्याला राहिलेलें नव्हतें. त्याचे अनिष्ट परिणाम आपण भोगीत आलों, आजहि भोगीत आहों. प्रत्येक जीवाप्रमाणें मनुष्यांतहि स्वार्थवृत्ति आहे; परंतु सर्वांच्या हितांतच आपलें हित, आपला स्वार्थ मानणें हीच मनुष्याची विशेषता आहे. अजूनहि आपण आपल्या सर्वांच्या मिळून सद्गुणानें, स्वार्थत्यागानें प्राप्त होणारें असें उदात्त ध्येय धारण केलें नसल्यामुळें आपल्या सर्वांच्या शक्तींत–कर्तृत्वांत एकजीवपणा येऊं शकत नाहीं. आपणां सर्वांत ऐक्य निर्माण होऊन सर्वांत एकच प्राण संचरूं लागत नाहीं. आपलें साधुचरित व कर्तृत्ववान् पुढारी आपल्याला स्वार्थत्यागाचा व ऐक्याचा उपदेश करीत असतांहि अजून तो आपल्या चित्तांत रुजत नाहीं.

## आमचा परमार्थहि स्वार्थपर

'तूं स्वतःचें सुख पहा.' 'तूं स्वतःपुरतें पहा.' 'जगाच्या भानगडींत पडण्याचें तुला कारण नाहीं.'- अशा प्रकारचे उपदेश व संस्कार लहानपणापासून आम्हांला मिळत असल्यामुळें व आमच्या पिढ्यान्-पिढ्या याच स्थितींत गेल्यामुळें आमच्या रक्तांत ते उपदेश व संस्कार भिनून आमच्या स्वतःविषयींच्या कल्पना अगदीं संकुचित बनून गेल्या आहेत. त्यामुळें कोणताच उदात्त सामुदायिक भाव आमच्यांत निर्माण न होतां संसारांत आम्ही केवळ स्वार्थामागें असतों. कांहीं कारणानें संसाराचा वीट येऊन धर्म व अध्यात्म यांचा विचार करूं लागलों तरी त्या बाजूलाहि आम्हांला स्वार्थापलीकडे दुसरा उपदेश मिळत नाहीं. "तूं जगांत एकटा आला आहेस व शेवटीं एकटाच जाणार आहेस." "जगांत कोणी कोणाचा नाहीं." स्वतःला मायाजाळांतून सोडवून घे." "ईश्वरप्राप्ति करून घे." 'तूं कोण आहेस हें जाणून घे.' 'जन्ममरणांतून मुक्त हो. मोक्षप्राप्ति करून घे.'–हाच उपदेश आम्हांला मिळत असतो. कोठेंहि राहा, कोठेंहि जा, कांहींहि वाचा, कोणाचाहि उपदेश ऐका. याशिवाय दुसरा उदात्त विचार किंवा संस्कार प्राप्त व्हायचा नाहीं. संसारांतील स्वार्थपर उपदेशच परमार्थांत आत्म्याच्या नांवानें मिळत असल्यामुळें तो आम्हांला तेव्हांच पटतो व रुचतो. कारण तो आम्हांला स्वार्थ सोडायला लावीत नाहीं, इतरांविषयीं विचार करायला लावीत नाहीं. किंवा त्यांच्याकरितां कष्ट करायला लावीत नाहीं संसारांत आम्ही आमच्याच वृत्तींचें पोषण, वर्धन व शमन करीत असतों व परमार्थाच्या नांवावरहि आम्ही तोच प्रकार करतों. परंतु दोहोंपैकीं कोणत्याहि ठिकाणीं आम्ही आमच्या वृत्तींना तपासीत नाहीं. आपल्या वृत्ती धर्म्य आहेत कीं अधर्म्य, त्या योग्य आहेत कीं अयोग्य, त्या परहितसाधक आहेत कीं बाधक किंवा घातक आहेत यांचा आम्ही विचार न करतां आम्ही केवळ आमच्या वृत्तींच्या मागें लागतों. अशा रीतीनें कोणताच उदात्त आदर्श आमच्यापुढें नसतां आमचें जीवन चाललेलें आहे !

## सामुदायिक उदात्त आदर्शांची आवश्यकता

चातुर्वर्ण्यसमाजरचनेंत जेव्हां जिवंतपणा होता तेव्हां जीवनविषयक कांहीं उदात्त आदर्श आमच्यापुढें होता. यज्ञोपवीताच्या दीक्षेपासून ब्रह्मचाऱ्याला पवित्र, उदात्त व व्यापक संस्कार मिळत राहतील अशी शिक्षणपद्धति एके काळीं आपल्यांत होती. त्या पद्धतीच्या द्वारें जीवनाच्या आध्यात्मिक हेतूचें त्याला नित्य स्मरण दिलें जात असे. त्या काळच्या क्षत्रिय ब्रह्मचाऱ्याचें एका ग्रंथांत शब्दचित्र आलेलें आहे, त्यावरून त्या काळांतील शिक्षण, संस्कार, जीवन वगैरेविषयीं आपल्याला कांहीं कल्पना येऊं शकतेः

पृष्ठिं बांधिले भाते दोन । माजिं भरले बहुत बाण
त्यावरि चूडा लंबमान । सुटोनियां रुळताहे ॥ १ ॥
वाम हस्तिं भव्य कोदंड । दक्षिण हस्तिं अश्वत्थदंड ॥
रुद्राक्षांचीं वलयें अखंड । मनगटामाजिं शोभती ॥ २ ॥
भस्म चर्चिलें सर्वांगीं । मृगचर्म धारिलें ऊर्ध्वभागीं ।
कौपीन असे अधोभागीं । ब्रह्मचारी-लक्षण हें ॥ ३ ॥

अशा प्रकारची ब्रह्मचारी मूर्ति ध्यानांत आणल्यास त्याची शारीरिक स्थिति, त्याची दिनचर्या, त्याचा अभ्यास-संस्कार व जीवनाचा आदर्श काय असावा याची कल्पना आपल्याला येऊं शकते. अशा मूर्तींतूनच बलशाली व प्रतापशाली, धर्मनिष्ठ व

कर्तव्यनिष्ठ समाजरक्षक निर्माण होत असत. केवळ व्यक्तिगत सुखोपभोगांना व कामनांना, वृत्तींना व भावनांना त्या काळांत महत्त्व नसलें पाहिजे. ब्राह्मण ब्रह्मतेजाला वृद्धिंगत करण्याकरितां जगत होते व या श्रेष्ठवर्णाच्या कर्तव्यनिष्ठेची व धर्मनिष्ठेची छाप सर्व समाजावर पडत असलीच पाहिजे; व अशा रीतीनें सर्व समाज जीवनाच्या उच्च आदर्शाकडे जात असलाच पाहिजे. कोणत्याहि राष्ट्राच्या बल–व–प्रतापाच्या उत्कर्षाचा काळ तपासल्यास त्या काळीं त्याची निष्ठा कोणत्यातरी पवित्र, उच्च व उदात्त तत्त्वावर असल्याचें आढळून आल्याशिवाय राहणार नाहीं. ग्रीक राष्ट्राच्या उत्कर्षाच्या काळांत जन्मास आलेल्या प्रत्येक बालकाला शारीरिक कठोर परीक्षेतून जावें लागत असे. त्यांतून तें वांचलें तरच तें ग्रीक राष्ट्राची भावी पिढी म्हणून उत्तम रीतीनें वाढविलें जात असे. या व्यवस्थेमुळें वाटेल तशी निष्प्राण प्रजा राष्ट्रांत वाढत नसेल व केवळ लोकसंख्येंत भर पडून राष्ट्रावर निष्कारण तिचा भार वाढत नसे. अशाच काळांत धर्मापिली गाजविणारे वीर निर्माण होत असतात. राष्ट्रांत बल, तेज, उत्साह हीं तेव्हांच वाढत असतात, जेव्हां त्यांच्यापुढें —त्यांतील सर्व प्रजेपुढें— सर्वांचा मिळून एकमात्र कांहींतरी पवित्र, उदात्त व महान् आदर्श असतो. सर्वांचें मिळून एकच उदात्त ध्येय सदैव सर्वांच्या डोळ्यांसमोर असतें, ज्यावर सर्वांची निष्ठा असते. आपल्या वैयक्तिक कामना, वृत्ति, भावना यांपैकीं कोणत्याच गोष्टीला महत्त्व न देतां—आपल्या व्यक्तिगत सुखदुःखाची परवा न करतां त्यांनीं आपल्या आदर्शावरील निष्ठा दृढ केलेली असते. त्या आदर्शाकरितां व त्या निष्ठेकरितां प्रसंगीं स्वतःच्या शरीराची आहुति देण्याची त्या प्रजेपैकीं प्रत्येकाची तयारी असते.

फार काळ होऊन गेला, अशा प्रकारचा उच्च व पवित्र, उदात्त व सदैव प्रेरणादायक असा कांहीं आदर्शच आपल्याला राहिलेला नाहीं. बाहेरच्या वाटेल त्या प्रजेनें येऊन आम्हांला लुटावें, मारावें, लाथाडावें, आम्हाला गुलाम म्हणून राबवावें, आमच्यावर मन मानेल तसें राज्य करावें ही आमची स्थिति आहे. शेंकडों वर्षांच्या आमच्या आदर्शहीन जीवनाचा हा परिणाम आहे. बदलत्या काळानुरूप आमच्या धार्मिक व सामाजिक नियमांतहि, आपली सर्वांची मानवता टिकूं व वाढूं शकेल अशा प्रकारचा बदल करणें आवश्यक असतां त्याकडे आम्ही दुर्लक्ष केल्यामुळें—करीत राहिल्यामुळें—आमच्यांत आजची पामरता आली आहे. केवळ वैयक्तिक सुखसंतोषाच्या मागें लागण्याशिवाय आम्हांला दुसरें ध्येय नाहीं. प्राचीन काळांतील निरुपयोगी झालेले धर्मनियम आचरीत राहून त्यायोगें आज आम्ही धार्मिक समाधान मिळविण्याचा प्रयत्न करीत आहों. पुरुषार्थहीन प्रवृत्तींतून व गृहस्थाश्रमांतून निर्माण होणारी आमची निवृत्तिहि तितकीच निष्प्राण व निस्तेज असल्यामुळें प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंतहि आमची अधोगति दिसून येत आहे. संसारांत क्षुद्र विकारमय स्वार्थी जीवन, व परमार्थाच्या नांवावर कर्तृत्वहीन व ज्ञानहीन असें कल्पनावश व भावनावश जीवन ! अशा रीतीनें प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंमधून विवेकशुद्ध व पुरुषार्थयुक्त जीवनाचा आमच्यांतून लोप होऊन गेला आहे.

## मानव्याचा पुनर्लाभ कसा होईल ?

आपल्या पडतीच्या काळांतहि आपल्या देशांत अनेक धार्मिक संप्रदाय निर्माण झाले. परंतु त्यापैकीं क्वचितच कोणी सामुदायिक ध्येयाकडे लोकांना वळविण्याचा प्रयत्न केला असेल. प्रत्येक सांप्रदायिक ग्रंथांत इहलोकापेक्षां परलोकचें सुख, आनंद व ऐश्वर्य यांचींच वर्णनें केलेलीं व तें प्राप्त करून घेण्याचीं साधनें सांगितलेलीं सांपडतील. वैयक्तिक व काल्पनिक ध्येयाशिवाय उदात्त सामुदायिक ध्येयाचा विचार कोणत्याहि सांप्रदायाला सुचल्याचें दिसून येत नाहीं. गृहस्थाश्रमाच्या शुद्धीचा, कर्ममार्गांतील दोष घालवून त्याला उज्ज्वल करण्याचा प्रयत्न कोणाकडूनहि झाल्याचें दिसून येत नाहीं. प्रवृत्तीकडे दुर्लक्ष करून निवृत्तीला महत्त्व देण्याचें कामच बहुशः प्रत्येक सांप्रदायाच्या द्वारें होत आलें आहे. या सर्वांचीं कारणें वैराग्याच्या आपल्या खोट्या समजुती, निवृत्तिमार्गाविषयीं चालत आलेली श्रद्धा, कर्ममार्गांतील आपलें दौर्बल्य व तद्विषयक अनास्था, त्याच्या शुद्धीविषयींची अशक्यतेची कल्पना व एकंदरीनें सर्व बाबतींतील निराशा हींच असावींत असें वाटतें. परंतु हीं किंवा

यासारखींच आपल्या अवनतीचीं आणखी कांहीं कारणें असलीं तरी तीं सर्व नष्ट केल्यावांचून आता आपल्याला गति नाहीं. केवळ्याहि दिव्य पण केवळ व्यक्तिगत सुखाच्या कल्पनेंत, लोभांत, मोहांत आपण आतां न सांपडलें पाहिजे. परलोकच्या काल्पनिक सुखापेक्षां इहलोकाच्या कर्तव्याला व त्यापासून मिळणाऱ्या सात्त्विक आनंदाला आपण आतां महत्त्व दिलें पाहिजे. पिढ्यान्‌पिढ्या चालत येत येत आज आपल्याला मिळालेला मानवी शक्ति-बुद्धीचा वारसा, आपलीं कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, प्राण, मन, बुद्धि या सर्वांत संचरणारी चैतन्यशक्ति या सर्वांचा उपयोग कोणत्या रीतीनें करून आपलें जीवन सफल करून घ्यावें याचा विचार आपण केला पाहिजे. मानवी जीवन, मानवी संबंध, आपली भावी पिढी या सर्वांच्या कल्याणाच्या दृष्टीनें आपण विचार करूं लागलों तर आपल्याला आपल्या खऱ्या धर्माचें ज्ञान झाल्याशिवाय राहणार नाहीं. व्यक्तिगत सुखाला किंवा श्रेष्ठतेला महत्त्व न देतां, व्यापकरीतीनें जीवना-विषयीं विचार करायला आपण शिकलों, आपण मनुष्य आहों व सर्वप्रकारें मनुष्य म्हणून जगण्या-करितां आपला जन्म आहे ही गोष्ट जर आपल्या अंतःकरणांत बिंबली, तर आपल्यांतील शक्तीचें आपल्याला निराळ्याच स्वरूपांत दर्शन होईल. आपलेपणाची आपली संकुचित भावना जर नष्ट झाली, समुदायाविषयीं आपलेपणा वाटण्याइतकी विशालता आपल्या हृदयांत प्रकट झाली तर आपलीं वैयक्तिक ध्येयें व त्यांतील सुखाच्या, आनंदाच्या व दिव्यतेच्या कल्पना वगैरेंतील हीनता व असत्यता आपल्या स्पष्टपणें निदर्शनास येऊन जीवनविषयक सारे क्षुद्र आदर्श आपल्या चित्तांतून मावळून जातील. आपल्याच विकारांच्या किंवा भावनांच्या अधीन होण्यांत मनुष्यता नाहीं. पण विकार व भावना यांच्या निमित्तानें प्रकट होणाऱ्या मानवांतील अनेकविध शक्तींना विवेकशुद्ध करून त्यांना योग्य कार्यांत व कर्तव्यांत परिणत करणें यांतच मनुष्यता आहे हें आपल्याला समजूं लागेल. अशा रीतीनें आपल्यांत विवेक व धर्म यांची जागृति झाल्यास आपल्यांतील नष्ट होत चाललेलें मानव्य आपल्याला पुनः लाभूं लागेल.

## संयम-प्रेरणा-विवेक-शक्तींचा विकास

मनुष्यांत अनेक प्रकारच्या शारीरिक, बौद्धिक व मानसिक शक्ती आहेत. त्या शक्ती हरएक वृत्तीच्या व कर्मांच्या द्वारें आपल्या इच्छेनें किंवा अनिच्छेनें मनुष्यांतून बाहेर पडत असतात. यंत्रांत निर्माण होणारी वाफ जशी योग्य कार्यांत योजकपणें उपयोगांत आणल्यानें तिच्यापासून महान् कार्यें घडवून आणतां येतात—त्याचप्रमाणें मानवांत असलेली शक्ति विकार—व—भावनांच्या निमित्तानें अव्यवस्थितपणें व अविवेकीपणें व्यर्थ जाऊं न देतां, तिला वाढवून शक्य तितकी शुद्ध करून आपण तिला योजकपणें उपयोगांत आणूं शकलों तर तिच्यायोगें कितीतरी महान् सत्कार्यें साधतां येतील. तशीं महान् कार्यें करण्याकरितां आपल्या एकूण एक वृत्तींचें आप-ल्याला शोधन करावें लागेल. अयोग्य वृत्तींना निरोधून त्यांना भावनांत परिणत करावें लागेल. त्या भावनांनाहि शुद्ध करून विवेकानें त्यांचा योग्य कार्यांत व कर्तव्यांत सदैव उपयोग करावा लागेल. कोणतीहि भावना—ती कितीहि दिव्य वाटत असली तरी आपल्या चित्तांत केवळ कल्पनारूपानें ती घोळत न राहिली पाहिजे. तिच्यानेंच लुब्ध होऊन आपण तींतच रममाण न झालें पाहिजे. तसें करणें म्हणजे आपल्याच कल्पनासृष्टींत रमत राहण्याचा तो आपणच निर्मिलेला एक मनोमय खेळ आहे. त्यांत आपल्या कोणत्याच शक्तीचा विकास नसून तो आपला केवळ मनोविलास आहे. त्यांत आनंद असेल पण त्यांत मानवोचित पुरुषार्थप्राप्त अशी प्रसन्नता नाहीं. ईश्वराविषयक भावनाहि आपल्या चित्तांत केवळ रमत राहिल्यास त्यांत आवेश किंवा मस्ती थोडा काळ वाटण्याचा संभव आहे; परंतु त्यांत कर्तृत्वशक्ति नाहीं. वैयक्तिक कल्याणाच्या हेतूनें आपण ईश्वराशीं तन्मय होण्याचा प्रयत्न केला, आणि त्यायोगें आपल्याला तन्मयताहि वाटली तरी त्यायोगें जोंपर्यंत आपल्यांत ईश्वरी शक्तीचा संचार होत नाहीं व तशा प्रकारचें कर्तृत्व प्रकट होत नाहीं तोंपर्यंत त्या तन्मयतेला मनाच्या विश्रांतीपेक्षां अधिक महत्त्व नाहीं. मनःकल्पित वाढविलेल्या प्रेमोन्मत्त अवस्थेचाहि ईश्वरविषयक कांहींतरी असंबद्ध बोलत राहण्याशिवाय दुसरा

कांहीं उपयोग होत नसल्यास ती अवस्था जीवनविषयक कल्याणाच्या दृष्टीनें वृथा आहे. ज्याला जीवनसिद्धि साधायची असेल त्यानें केवळ कल्पनासृष्टींत केव्हांहि न राहिलें पाहिजे. त्यानें आपल्यातील सर्व वृत्तींना व शक्तींना शुद्ध करून व वृद्धिंगत करून त्या सर्वांना ताब्यांत ठेवण्याची शक्ति प्राप्त केली पाहिजे. वृत्तींना वाटेल तशा स्वैरपणें बाहेर न पडूं देण्याकरितां आपल्याला संयमशक्तीची जरूर आहे व त्यांना योग्य कार्यांत लावण्याकरितां आपल्यांत प्रेरकशक्ति असणें आवश्यक आहे. तसेंच आपलें कर्तव्य ओळखून त्याकरितां या दोन शक्तींचा यथाकालीं व यथायोग्य उपयोग करण्याकरितां आपल्याला विवेकशक्तीची जरूर आहे या मुख्य तीन शक्तींच्याविकासांतच मानवता आहे व सामुदायिक ध्येय–व–कर्तव्याच्या मार्गानें आपल्याला तीच साधायची आहे.

## ईश्वरभक्ति ही उचित आचरणाशिवाय अपूर्णच

कोणी म्हणतील कीं ईश्वरी प्रेमाइतकी पवित्र व श्रेष्ठ भावना जगांत दुसरी नाहीं. म्हणून त्या प्रेमांत मग्न होऊन जाण्यापेक्षां अधिक श्रेष्ठ कार्य जीवनांत काय असणार? ईश्वरी प्रेमाइतकी पवित्र व श्रेष्ठ भावना जगांत नाहीं ही अगदीं सत्य गोष्ट मानली तरी त्या भावनेंत मनुष्य चोवीस तास मग्न कधींहि राहूं शकत नाहीं. फार तर किंचित् काल मग्न राहूं शकेल. त्या किंचित् कालांतील मग्नतेंत मनुष्यानें धन्यता व मानवता मानावी, कीं त्या पवित्र भावनेचा जीवनाच्या हरएक क्षेत्रांत, हरएक व्यक्तींशीं येणाऱ्या संबंधांत, कर्मांत, कर्तव्यांत उपयोग करीत राहून त्या द्वारें ती दिव्य व पवित्र भावना प्रकट करीत राहण्यांत धन्यता व मानवता मानावी? मानवी हृदयांतील कोणतीहि व कितीहि दिव्य व श्रेष्ठ भावना उचित कर्माचरणाशिवाय पूर्ण होऊं शकत नाहीं. म्हणून ज्या भावनेचें पर्यवसान उचित कर्मांत होत नाहीं, ती भावना पवित्र व दिव्य असली तरी ती निष्फल आहे असें समजण्यास काय हरकत आहे? ईश्वराशीं तन्मय झाल्यानें जर ईश्वरी सामर्थ्य, पुरुषार्थ व कर्तृत्व हीं आपल्यांत संचरलीं नाहींत–ईश्वराशीं तद्रूप झाल्यानेंहि जर आपल्यांत दया, न्याय, उदारता, सत्य वगैरे ईश्वरी गुण प्रकट झाले नाहींत तर त्या तन्मयतेंत व तद्रूपतेंत अर्थ काय आहे? आपणच निर्माण केलेल्या कल्पनेशीं केवळ तन्मय व तद्रूप झाल्यानें कोणत्या ईश्वरी शक्तीचें आपल्याद्वारें प्रकटीकरण होणार? आपल्या स्वतःतच जर शक्ति नसेल, पुरुषार्थ नसेल, कर्तृत्व नसेल तर आपल्यांतून निर्माण झालेल्या कल्पनेंत तरी या गुणांचें दर्शन कोठून होणार? म्हणून मानवतेचें हें ध्येय नाहीं. मानवतेला पुरुषार्थाची जरूर आहे. पुरुषार्थाला कर्ममार्गाची आवश्यकता आहे. ऐन तारुण्यांत भक्ति, चित्ताचा लय, ब्रह्म किंवा आत्मसाक्षात्कार वगैरेंच्या निमित्तानें निवृत्तिपरायणता येण्यास ध्येयविषयक खोट्या समजुती, अकर्तृत्व, खोट्या महत्त्वाकांक्षा, कर्ममार्गांतील अपयश, निराशा किंवा त्यामार्गांत योग्य कार्य न मिळणें वगैरे कारणांपैकीं एकादें किंवा अनेक कारणें असलीं पाहिजेत. त्या काळांत आपल्यांतील क्रियाशक्तीला उपयोगांत आणायला मनुष्याला योग्य रस्ता मिळेल, योग्य कार्य मिळेल, त्या कार्यांतून शुद्ध आनंद मिळूं लागेल, तर काल्पनिक आनंदाकडे कोणीहि जाणार नाहीं. जीवनाचें योग्य ज्ञान असेल तर मनुष्य मुद्दाम भ्रमांत पडणार नाहीं. कर्तृत्व वाढविण्यास मनुष्याला कांहीं उपाय मिळत असेल तर सत्कर्महीन खोट्या महत्त्वाकांक्षेच्या मागें तो लागणार नाहीं; व मानवतेचें ध्येय तो जाणत असेल तर कोणत्याहि काल्पनिक ध्येयांत तो कधींहि पडणार नाहीं.

मानवधर्मानें वागल्यानेंच मानवतेची प्राप्ति होणें शक्य आहे. केवळ शारीरिक–बौद्धिक श्रेष्ठतेनें किंवा ईश्वरविषयक भावनातिशयितेच्या काल्पनिक आनंदानें मानवता साधणें शक्य नाहीं. समुदायानें समुदायाच्या सुरक्षेकरितां, उन्नतीकरितां व कल्याणाकरितां आचरायचे जे नियम तोच मानवी धर्म. तो एकांगी असूं शकत नाहीं. तो केवळ व्यक्तीच्या सुखाचा किंवा आनंदाचा विचार करून ठरवतां येत नाहीं. सामुदायिक सुख, सामुदायिक आनंद, सामुदायिक उन्नति व कल्याण या कल्पना त्याच्या मुळाशीं असाव्या लागतात. त्या कल्पनांना विरोध न येईल अशा रीतीनें कोणताहि

वैयक्तिक सात्त्विक आनंद घेण्याला त्यांत निषेध नाहीं. जें सुख व जो आनंद सर्वांना घेण्यास कोणतीच अडचण नाहीं, जो घेण्यानें कोणच्याहि योग्य सुखाला किंवा आनंदाला अडथळा येत नाहीं, जो व्यक्तीच्या स्वतःच्याहि शारीरिक, बौद्धिक किंवा मानसिक अशा कोणत्याच उन्नतीला बाधक होण्याचा संभव नाहीं, तो आनंद सात्त्विक आहे. तो आनंद सामुदायिक कल्याणाला बाधक नसून पोषक आहे. मानवी धर्मांत समुदायाच्या हिताला पोषक अशा व्यक्तिगत आनंदाला स्थान आहे. काल्पनिक आनंदापेक्षां त्याचें महत्त्व व उपयुक्तता मानवी धर्माच्या व कर्ममार्गाच्या दृष्टीनें श्रेष्ठ आहे. कर्ममार्गाच्या व गृहस्थाश्रमाच्या शुद्धीचा आपण विचार न केल्यामुळें सात्त्विक आनंदाला आपण मुकलों आहों. समुदायाचा विचार करून कर्ममार्गाला प्रभावशाली करण्याचा प्रयत्न आपण न केल्यामुळें आपल्या जीवनांतील सर्व खरे सात्त्विक रस उडून गेले आहेत. संसाराला पापरूप समजल्यामुळें आपलें दौर्बल्य, आपला असंयम व स्वार्थ यांच्यायोगें त्याला अधिकाधिक दोषमय करायला आपल्याला कांहींच वाटेनासें झालें आहे. आनंदाशिवाय मनुष्य राहूं शकत नाहीं व सात्त्विक आनंद आपण प्राप्त करूं शकत नाहीं. अशा स्थितींत आपण राजस व तमोगुणी आनंदाचे भोक्ते बनून संसाराला अधिक पापमय करीत आलों आहों. आणि संसाराला विटलेल्यांनीं किंवा त्यांत अपयशी झाल्यामुळें निराश झालेल्यांनीं अथवा त्याचें भय मानलेल्यांनीं ईश्वरविषयक काल्पनिक आनंदांत रममाण होण्याचे मार्ग काढले आहेत. त्या आनंदालाच आपण सात्त्विक आनंद समजत आलों आहों. परंतु त्यानें कर्ममार्ग शुद्ध झाला नाहीं, त्यानें संसार सुधारला नाहीं.

## कर्ममार्गाची शुद्धि कशी होऊं शकेल ?

ईश्वर खरोखर कसा आहे त्याचा अजून कोणालाच पत्ता लागला नाहीं. तरी आमच्या भावतृप्तीकरितां—आम्हांला प्रेम पाहिजे तेव्हां त्याला प्रेमस्वरूप, आनंद पाहिजे तेव्हां आनंदस्वरूप, आम्हांला दया पाहिजे असते तेव्हां त्याला दयासिंधु, वात्सल्य पाहिजे तेव्हां त्यालाच भक्तवत्सल, दीनवत्सल, मातापिता, पावन व्हावेंसें वाटतें तेव्हां त्याला पतितपावन वगैरे वगैरे—जसा ज्या समयीं आम्हांला पाहिजे तसा आम्ही त्याला कल्पून, बनवून त्यापासून स्वतःला आनंद, धीर, आधार व समाधान मिळविण्याचा आम्ही प्रयत्न करीत आलों आहों. अशाप्रकारें संसारांत व परमार्थांत आम्ही आमच्या व्यक्तिगत वृत्ति, इच्छा, भाव, श्रद्धा वगैरेंचें पोषण, वर्धन व शमन करीत राहिलों. त्याचा कर्ममार्गावर इष्ट असा कांहींच विशेष परिणाम झाला नाहीं. त्यायोगें आपलें दौर्बल्य, आपली पंगुता कमी झाली नाहीं. त्यापेक्षां ईश्वराच्या ठिकाणीं आम्ही जें जें कल्पिलें त्या त्या सर्वगुणांनीं युक्त होण्याचा, त्याचे ठायीं कल्पिलेल्या गुणांप्रमाणें आम्ही स्वतः प्रेमस्वरूप, आनंदस्वरूप, दया-वात्सल्यभरित होण्याचा, त्याच्याचप्रमाणें न्यायपरायण बनण्याचा प्रयत्न आम्ही केला असता तर त्याचे सुपरिणाम समाजांत व आमच्यांत एकमेकांवर होत राहून आमचें जीवन खरोखरच सुखी व आनंदी झालें असतें. आम्ही सद्गुणांवर भर देत आलों असतों तर आमच्यांतील सद्गुणांची वृद्धि होत आली असती. त्यायोगें आम्हां सर्वांस एकमेकांचा आधार झाला असता. एकमेकांपासून आम्हांस धीर व आनंद मिळाला असता. अशा स्थितींत आमच्यांत सहजच ऐक्यभाव निर्माण होऊन तो अखंड राहिला असता. आपसांतील सद्भावानें आमच्यांत परस्परविश्वास उत्पन्न होऊन त्यायोगें आमचा उत्कर्ष झाला असता. परंतु अशा प्रकारच्या प्रत्यक्ष कर्ममार्गांत उपयोगी पडणाऱ्या सद्गुणांचा आग्रह आम्ही धरला नाहीं. कर्ममार्गाच्या शुद्धीचा व त्यांतूनच प्रत्यक्ष आनंद मिळवण्याचा आग्रह मनुष्य ठेवतो तेव्हां त्याला प्रत्यक्ष चांगल्या गोष्टी आचराव्या लागतात, बुद्धि चालवावी लागते, योजना घडवाव्या लागतात व प्रयत्नपूर्वक शेवटीं यशस्वी व्हावें लागतें. त्या सर्व प्रयत्नांत त्याचा स्वतःचा अनेक बाजूंनीं विकास होतो. सात्त्विकतेबरोबरच त्याचें कर्तृत्वहि वाढतें. त्याच्या सद्गुणांत भर पडते. त्याचें कर्मकौशल्य व तद्विषयक त्याची पात्रता यांची वृद्धि होते. त्याच्या प्रयत्नानें इतरांसहि तो मार्ग व उपाय सुगम होतो. अनेकांस त्याचे अनेकरीत्या लाभ होऊं शकतात. अनेकांतील सात्त्विकता जागृत होते. इतरांच्या

सद्गुणांना चालना मिळते. कर्ममार्गांतील अज्ञान, अशुद्धि व जडता नाहींशी होऊन आपल्यांतील व इतरांतील पुरुषार्थ वृद्धिंगत होतो. त्यांत काल्पनिकता नसल्यामुळें कर्ममार्गांत प्रत्यक्ष झालेली सुधारणा व समाजाची वाढलेली पात्रता या गोष्टी तशाच पुढें चालू राहतात. सात्त्विक आनंदाचे निरनिराळे प्रकार समाजांत रूढ होतात व त्यायोगें एकंदरींत सर्व समाजाचें शुद्धीचें व नीतीचें प्रमाण वाढत जातें. या दृष्टीनें केवळ काल्पनिक वैयक्तिक सुखाचा व आनंदाचा विचार करतां त्यायोगें आपली किंवा समाजाची कोणतीच शक्ति वाढत नाहीं. म्हणून अशा सुखाची किंवा आनंदाची व्यक्तीच्या,समाजाच्या उन्नतीच्या दृष्टीनें विशेष किंमत मानतां येत नाहीं.

या सर्व विचारांवरून हेंच वाटत आहे कीं कर्ममार्गाची शुद्धि तेव्हांच होऊं शकेल जेव्हां आपण वैयक्तिक व केवळ कल्पनाजन्य आनंदाला जीवनांत महत्त्व देणार नाहीं. संयम, कर्तृत्व, पुरुषार्थ व विवेक यांच्या साहाय्यानें आपण प्रत्यक्ष आनंद प्राप्त करण्यांत व्यक्ति-व-समाजदृष्ट्या केवढे प्रत्यक्ष लाभ आहेत तें आपण तेव्हांच समजूं शकूं, जेव्हां आपणां सर्वांचें एकमात्र उदात्त ध्येय–जें सर्वांच्या प्रयत्नानें व सद्गुणानेंच प्राप्त होऊं शकेल अशा प्रकारचें-होऊन जाईल; व जेव्हां आपल्यांतील सर्व वृत्ती, कल्पना, भावना यांचा एकमात्र उदात्त सामुदायिक ध्येय साध्य करण्याकडे उपयोग करीत राहण्याचें आपणां सर्वांना सुचेल व साधेल. अशा रीतीनें आपणां सर्वांच्या एकमात्र ध्येयानें कर्ममार्गाची शुद्धि होत राहिली तर त्यायोगें आपणां सर्वांचेंच नैतिक व आध्यात्मिक पात्रता सहजच वाढत राहील. मग जीवनाच्या हरएक कार्यांतून, कर्तव्यांतून आपल्याला सात्त्विक आनंद मिळत राहून आपणां सर्वांच्या जीवनांत तो आनंद दिसून येईल. माधुर्य, प्रेम, मैत्री, औदार्य, वात्सल्य, विनय, मातृपितृभाव, बंधुभगिनीभाव, दया, निरहंकारता वगैरे सद्गुण यथाकालीं आपल्यांतून प्रकट होत राहतील. जीवनांत हरएक व्यक्तीशीं येणाऱ्या संबंधांतील व प्रसंगांतील लहानमोठ्या कर्मांपासून आपल्याला व इतरांना ज्ञान-व-आनंदाची प्राप्ति होत राहील.

## निवृत्तिपरायण लोकांचा काल्पनिक आनंद

यानेंच कर्ममार्ग सुधारून गृहस्थाश्रमाची शुद्धि साधणार आहे. हा मार्ग ज्यांना सुचला नाहीं, ज्यांना संयम व प्रेम धारण करतां आलीं नाहींत, त्यांनीं आपल्या स्वार्थवृत्तींमुळें संसाराला अधिक दोषमय बनवून त्यांतील अगोदरच्याच तापत्रयांत भर घातली व संसाराला अधिक दुःखरूप बनविलें. विरक्त झालेल्या निवृत्तिपरायण बहुतेक व्यक्तींनीं आपल्यांतील कांहीं वृत्तींना–भावनांना उत्तेजित करून काल्पनिक रीतीनें भावतृप्तीचा कल्पनाजन्य आनंदप्राप्तीचा मार्ग स्वीकारला. परंतु अशा वैराग्यवंतांनीं केवळ आपल्याच वृत्तींना व भावनांना महत्त्व न देतां आपल्या सभोंवार, जरा आसपास–नजर टाकली असती तर कोणाचेंहि मन कारुण्यानें भरून जाईल अशी स्थिति त्यांना दिसून आली असती. मूर्तिमंत दुर्दशा, मूर्तिमंत दुर्भाग्य आपल्यासमोर व आजूबाजूला भरपूर असतांना, त्या सर्वांकडे दुर्लक्ष करून मनुष्यानें केवळ परमेश्वरी आनंदांत निमग्न होण्याची कां इच्छा करावी? जीवनांतील तोच काळ निःस्वार्थपणें दुःखितांच्या सेवेंत लावून त्यांच्या दुःखांचें सुखांत रूपांतर करण्याचा प्रयत्न जर मनुष्य करील तर त्यायोगें त्याला सात्त्विक आनंद नाहीं का मिळणार? जगांत आपल्याभोंवतीं इतकें दुःख, दारिद्र्य, अज्ञान व दोष पडले असतां केवळ आपल्या चित्तांतील वासनांचा वेग थोडा ओसरतांच गृहस्थाश्रमांत, कर्ममार्गांत आपलें कांहींच कर्तव्य उरलें नाहीं असें मनुष्यानें समजणें योग्य आहे काय? जगांत जुलूम, अन्याय, स्वार्थ वगैरेंचें साम्राज्य चालूं असतां इहलोकांतील आपलें कर्तव्य संपलें असें समजून ईश्वरी प्रेमांत मग्न किंवा मत्त राहण्याचा प्रयत्न करण्यांत मानवतेची वृद्धि होणें शक्य आहे काय?

## परिपूर्ण जीवनाचें महाव्रत

या सर्वांचें उत्तर व सर्वांचा सारांश हाच आहे कीं आपल्या सुखाच्या कल्पना निवळ वैयक्तिक म्हणजे केवळ स्वार्थी आहेत. कर्तृत्वांतून सात्त्विक आनंद मिळविण्याची आपल्याला कल्पनाहि नाहीं. सामुदायिक धर्म, सामुदायिक भाव, सामुदायिक

कर्तव्य यांची आपल्याला ओळख नाहीं. धर्म व अध्यात्म यांच्या निमित्तानेंहि आपण व्यक्तिगत कल्पनाजन्य आनंदाच्या मार्गें लागण्यास शिकलों आहों. परंतु या सर्वांतून आपण निघाल्याशिवाय आपण मानवता साधूं शकणार नाहीं. कर्ममार्गाच्या व गृहस्थाश्रमाच्या शुद्धींतूनच मानवतेचा मार्ग आहे. तो मार्ग आक्रमण करण्याकरितां सामुदायिक कर्तव्यनिष्ठेची व सात्त्विकतेची जरूर आहे. त्या सात्त्विकतेंत जितकें संयमाला महत्त्व आहे, तितकेंच जीवनांत स्फूर्ति देणाऱ्या पवित्र आनंदालाहि महत्त्व आहे. पुरुषार्थ व साधेपणा, कर्तृत्व व निरहंकारिता, आत्मविश्वास व विनय वगैरे सर्व सद्गुणांची आपल्याला यांत जरूर आहे. माधुर्य, सौंदर्य व चातुर्य वगैरे सर्वांची आपल्याला आवश्यकता आहे. परंतु या मार्गांत कोणत्याहि प्रकारच्या क्षुद्रतेची भावना वर्ज्य मानली आहे. जगांतील कलह, क्लेश, संताप, कटुता व नीरसता कमी करण्याकरितां आपल्यांत प्रेम, माधुर्य व शांति असण्याची फार आवश्यकता आहे. समाजांतील अज्ञान व अव्यवस्थितपणा नाहिंसा करण्याकरितां आपल्यांत ज्ञान व चातुर्य असणें आवश्यक आहे. दैन्य व दुःख नाहिंसें करण्याकरितां आपल्यांत पुरुषार्थ, कर्तृत्व व उद्योगप्रियता असली पाहिजे. अशा रीतीच्या सर्वांगपरिपूर्णतेंतच खरें सौंदर्य आहे. हा आपल्या जीवनाचा आदर्श आहे. अशा प्रकारचें परिपूर्ण जीवन केव्हां महाव्रताप्रमाणें भासेल तर केव्हां तें प्रेम, माधुर्य व आनंद यांचें परमधाम वाटेल. केव्हां विवेक व चातुर्य यांचें तें भांडार असल्याचें अनुभवास येईल तर केव्हां तें केवळ करुणा व पुरुषार्थ यांनीं भरलेलें आहे असें आढळून येईल. पण कोणत्याहि प्रसंगीं, कोणत्याहि दृष्टीनें त्याचेकडे पाहिलें तरी त्यांत विवेक, सेवापरायणता व उदात्तता हींच मुख्यतः दिसून येतील. या दर्शनांतच मानवता आहे. त्या ठिकाणीं आपणां सर्वांना जाऊन पोहोंचायचें आहे. आपलें जीवन हें आपलें एकट्याचें नसून तें समग्रांकरितां आहे ही निष्ठा ज्या हृदयांत बाणली त्या ठिकाणीं मानवता जाग्रत झाली असें समजावें. तें मानव्य ज्या समाजपद्धतींत वाढूं शकेल तशा प्रकारची समाजरचना आपल्याला पाहिजे आहे. महाप्रयत्नानें आपण ती घडवून आणली पाहिजे.

---

## सत्याग्रही समाज व समाजवादी समाज

चातुर्वर्ण्यांतील शूद्रवर्ग हा केवळ सेवा करणारा वर्ग असून तो संपत्ति व संस्कृति यांपासून दूरावलेला ठेवणें हें समाजाचें ध्येय होऊं शकत नाहीं; आणि सांपत्तिक व सांस्कृतिक दृष्ट्या शूद्रांना समतेचे हक्क देण्याचें तत्त्व गृहीत केल्यानंतर केवळ त्रैवर्णिकच समाज उरतो. जोंपर्यंत राज्यसंस्था आहे तोंपर्यंतच क्षत्रिय वर्णाची आवश्यकता आहे. राज्यसंस्थेची आवश्यकता नष्ट झाली म्हणजे क्षत्रियवर्ण आपोआप नष्ट होतो. सत्याग्रह व समाजवाद हीं दोनहि तत्त्वज्ञानें दंडहीन समाजालाच आदर्शभूत समाज मानीत असल्यामुळें त्यांच्या आदर्शभूत समाजांत क्षत्रियवर्णाला अवकाशच नाहीं. अशा प्रकारें शूद्र व क्षत्रिय हे दोन वर्ण नष्ट करणें हें ध्येय समाजवाद व सत्याग्रह या दोनहि तत्त्वज्ञानांस साधारण असेंच म्हटलें पाहिजे. मग केवळ ब्राह्मण व वैश्य हे दोनच वर्ण राहतात. यांपैकीं ब्राह्मण हे संन्यस्त व वैराग्यशील आणि वैश्य हे कर्मशील व भोगशील असा भेद आहे. या भेदाच्या दृष्टीनें सत्याग्रहाचें ध्येय सर्वांस ब्राह्मण बनवावें असें असून समाजवादाचें ध्येय सर्वांस वैश्य बनवावें, म्हणजे कर्मशील व भोगशील बनवावें असें आहे, असें कांहीं लोक म्हणूं शकतील. हाच अर्थ दुसऱ्या शब्दांत सांगावयाचा तर असा सांगतां येईल कीं, समाज एकवर्गी बनावा हें ध्येय दोहोंसहि समान असलें तरी सत्याग्रही समाज अपरिग्रही, भौतिकसुखप्रवण व प्रवृत्तिपर बनेल.

—आचार्य जावडेकर, 'आधुनिक राज्यमीमांसा' भाग २, पान १४०

डॉ. अ. स. अळतेकर

# मुलींचा वारसाहक्क

नविन प्रस्तावित हिंदु कायद्यामध्यें ज्या अनेक विवादास्पद गोष्टींचा अंतर्भाव केलेला आहे त्यांमध्यें मुलींचा वारसाहक्क ही एक महत्त्वाची बाब आहे. मुलींना वारसाहक्क पितृघराण्यामध्यें असावा का असूं नये यासंबंधीं हिंदु समाजांत हल्लीं फार तीव्र मतभेद आहे व तो मतभेद हिंदु लॉ कमिटीचें प्रतिवृत्त व प्रस्तावित कायदा यांमध्येंहि मनोरंजक तऱ्हेनें दिसून येतो. राव कमिटीनें आपल्या पहिल्या रिपोर्टमध्यें सभ्रातृक मुली अविवाहित राहिल्या तर त्यांना वारसाहक्क असावा असें जें प्रस्तुत लेखकाचें मत आहे त्याप्रमाणें आपणहि शिफारस करणार होतों, पण तसें केलें तर मुलींना विवाह न करण्याचा मोह उत्पन्न होऊन समाजामध्यें अनाचार वाढेल म्हणून आपण तसें केलें नाहीं असें लिहिलें आहे. हिंदु लॉ कमिटीनें जें बिल प्रथम सादर केलें होतें, त्यामध्यें सभ्रातृक मुलींना भावाच्या निम्मा हिस्सा असावा असें सुचविलें होतें. पण आतां बिलाला जें अखेरचें स्वरूप दिलें आहे त्यामध्यें मुलींना मुलांच्याएवढा वारसाहक्क असावा, थोडासुद्धां कमी असूं नये, असें सुचविलें आहे. यावरून आपल्या समाजांत हल्लीं या बाबतींत मतांचें कसें तीव्र व त्वरित आंदोलन होत आहे तें दिसून येईल. तीन महिन्यांपूर्वीं (फेब्रुआरी १९४९) हिंदु कोडावर असेंब्लीमध्यें तीन दिवस चर्चा होऊन ते पुनर्विचारार्थ स्थगित केलें आहे. पण यंदा बहुतेक हें बिल पास होईल असें वाटतें. तेव्हां मुलींच्या वारसाहक्काबद्दल खरोखर काय कायदा असावा याबद्दल निःपक्षपाती चौकशी करून, चर्चा करून समाजास आपलें मत बनवितां यावें या हेतूनें हा लेख लिहिण्यांत येत आहे. केवळ भावनाप्रधान होऊन या प्रश्नाकडे पाहण्यानें समाजहित साधेलच असें नाहीं.

## अभ्रातृक मुलींचा वारसाहक्क

अभ्रातृक मुलींचा वारसाहक्क आपल्या हिंदु-समाजांत वैदिक कालापासून मान्य करण्यांत आलेला आहे व तो कायद्यानें अनेक शतकें मान्य केलेला आहे. तेव्हां त्याबद्दल आतां चर्चा करण्याचें कारण नाहीं. तो मान्य करण्यास स्मृतिकारांनीं दिलेलीं कारणें मननीय आहेत. 'मुलगा हा प्रत्यक्ष आपला आत्माच असतो; मुलग्याप्रमाणेंच मुलगी असते; तेव्हां तिच्या हयातीमध्यें तिऱ्हाइतास पितृधन देणें हें अगदीं अन्याय्य होईल' असें नारदस्मृतीचें म्हणणें आहे:

यथैवात्मा तथा पुत्रः पुत्रेण दुहिता समा।
तस्यामात्मनि तिष्ठन्त्यां कथमन्यो धनं हरेत्॥

## सभ्रातृक मुलींचा वारसाहक्क

वरील अवतरणांत मुलाप्रमाणेंच मुलगी हीहि पित्याचें अपत्य आहे, तेव्हां तिलाहि पैतृक संपत्तींत वारसा मिळाला पाहिजे हें जें तत्त्व ग्रथित केलें आहे तें सभ्रातृक मुलींच्या बाबतींतहि मान्य करून त्यांनाहि स्मृतिकारांनीं वारसा द्यावयास पाहिजे होता असें हल्लीं एका पक्षाचें, विशेषतः सुशिक्षित स्त्रियांचें म्हणणें आहे. पण या सिद्धांतापासून हा जो स्वाभाविक निष्कर्ष निघतो तो आपल्या जुन्या स्मृतिकारांनीं काढला नाहीं हें मात्र खरें आहे.

अविशेषेण पुत्राणां दायो भवति धर्मतः
मिथुनानां निसर्गादौ मनुः स्वायंभुवोऽब्रवीत्।

या श्लोकावरून सभ्रातृक मुलींसहि वारसाहक्क असावा हें मत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न निरुक्तामध्यें एका पूर्वपक्षकारानें केला आहे हें खरें. पण तो फारसा युक्तियुक्त दिसत नाहीं. मिथुन पुत्र म्हणजे मुलगा व मुलगी हा अर्थ ओढून काढून

लावलेला आहे. मिथुन म्हणजे जोडपें. एकाद्या जोडप्यास जे मुलगे असतील त्या सर्वांना सारखे वारसाहक्क असावेत, थोरल्या मुलास विशेष अग्रहक्क असूं नयेत असें या श्लोकांत प्रतिपादण्याचा हेतु आहे; मुलींना मुलांबरोबरच वारसाहक्क देण्याचा नाहीं. प्राचीन काळीं वडील मुलास इतर भावांपेक्षां मोठा हिस्सा मिळे, त्याविरुद्ध मत या श्लोकांत प्रतिपादिलें आहे.

## तो मान्य करणाऱ्या अपवादात्मक स्मृति

इ. स. पू. सुमारें ३०० वर्षांपासून मुलींना विवाह हा नितांत आवश्यक करण्यांत आला. त्यामुळें वैदिक कालीं समाजामध्यें जशा कांहीं अविवाहित मुली राहत, तशा या वेळेपासून राहीनाश्या झाल्या. मुलींची लग्में हीं न्हावयाचींच; तेव्हां त्यांना आपल्या नवऱ्याच्या मिळकतींत तेवढे हक्क असावेत, बापाच्या मिळकतींत हक्क देण्याची जरूरी नाहीं असें सामान्यतः स्मृतिकारांचें मत होतें. यास शुक्रस्मृति हा एकच अपवाद आहे. या स्मृतीमध्यें असें प्रतिपादिलें आहे कीं जर एखाद्यानें आपल्या हयातींत आपल्या मिळकतीची वांटणी केली तर त्याची बायको व मुलगा यांना एक एक हिस्सा मिळावा, व मुलगी व ती नसली तर दौहित्र याना अनुक्रमें $\frac{1}{2}$ व $\frac{1}{4}$ हिस्सा देण्यांत यावा. बापाच्या मृत्यूनंतर जर वांटणी झाली तर बायकोला $\frac{1}{4}$ व मुलीला $\frac{1}{8}$ हिस्सा देण्यात यावा :

> समानभागा वै कार्याः पुत्राः स्वस्य च वै स्त्रियः।
> स्वभागार्धहरा कन्या दौहित्रस्तु तदर्धभाक्॥
> मृताधिपे तु पुत्राद्या उक्तभागहराः स्मृताः।
> मात्रे दद्याच्चतुर्थांशं भागिन्यै मातुरर्धिकम्॥
> ४.५ २९९–३००

बापाच्या मृत्यूनंतरच प्रायः वांटण्या होतात, तेव्हां शुक्रस्मृतीप्रमाणें मुलीस सामान्यतः मुलाच्या $\frac{1}{8}$ हिस्सा मिळूं शकेल.

'मातरः पुत्रभागानुसारेण भागहारिण्यः। अनूढा दुहितरश्च।' १८·३४ ] यासारखीं विष्णुस्मृतीमध्यें व 'समानभाजः शेषाः (पुत्राः) स्युरप्रत्ता भगिनी तथा' १३·१३ यासारखीं नारदस्मृतीमध्यें जीं वचनें आहेत, तीं आपाततः मुलींच्या वारसाहक्काची तरफदारी करणारीं आहेत असें वाटतें. पण या वचनांमध्यें मुलींना जो वारसाहक्क दिला आहे तो विवाहापर्यंतच राही. विवाहानंतर त्यांचा पैतृकधनावरील हक्क नष्ट होतो, असें नारदानें स्पष्ट बजाविलें आहे:

> या तस्य दुहिता तस्याः पित्र्योंऽशो भरणे मतः।
> आसंस्कारं भजेरंस्ताः परतो बिभृयात्पतिः॥
> १३·२७

असें मात्र समजण्याचें कारण नाहीं· कीं मुलींना मर्यादित कां होईना जो वारसा शुक्रनीतींत दिला आहे, तो प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांना कोठेंच मिळत नसे. शुक्रनीति जरी अपवादात्मक असली तरी तिचें अनुकरण म्हैसूरकडील कांहीं भागांत होत असे, असें दिसतें. म्हैसूर संस्थानांतील मुद्देरे तालुक्यांत एक ११८८ सालचा शिलालेख मिळाला आहे. त्यावरून माची नांवाच्या एका गृहस्थानें आपली जमीन आपले मुलगे व मुली यांमध्यें वांटून दिली होती असें दिसतें (एपि. कर्नाटिका, ६, मुद्देरे नं. २४). पण मुलींचा वारसाहक्क प्रतिपादणाऱ्या स्मृती व दर्शवणारे शिलालेख हे अपवादात्मकच आहेत यांत शंका नाहीं.

## विवाहखर्चाची तरतूद

इ. स. पू. ३०० च्या सुमारास मुलींना लग्न नितांतावश्यक करण्यांत आलें व विवाहोत्तर पालनपोषणाची जबाबदारी त्यांच्या सासरावर टाकण्यांत आली. तेव्हां स्वाभाविकच त्यांच्या विवाहखर्चाची जबाबदारी तेवढी त्यांच्या जनक-घराण्यावर ठेवण्यांत आली. स्मृतींचे यासंबंधीं नियम ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. एकाद्या घराण्याचा दर्जा व सांपत्तिक स्थिति यांवर त्यांतील मुलींच्या लग्नाचा खर्च अवलंबून असतो; तेव्हां स्मृतींना मुलीच्या लग्नाकारितां अमुक एक विशिष्ट रक्कम खर्च करावी असें सांगणें शक्य नव्हतें. मुलाला आपल्या पैतृक मिळकतींत जो हिस्सा मिळेल त्याच्या $\frac{1}{4}$ मुलींचा विवाहखर्च सामान्यतः समजावा असें स्मृतींचें म्हणणें आहे:

> असंस्कृतास्तु संस्कार्याः भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः।
> भगिन्यश्च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकम्॥
> —याज्ञवल्क्य २·१२४

सामान्यतः एवढ्या पैशांत त्यावेळीं लग्न करतां येत असे असें दिसतें. पण जर एवढी रक्कम अपुरी पडली, तर भावानें जरूर तर आपल्या हिश्श्याइतकी रक्कम बहिणीच्या लग्नाप्रीत्यर्थ खर्च केली पाहिजे, पैसे वांचविण्याकरितां अयोग्य वराशीं तिचें लग्न करतां कामा नये, असेंहि बजाविण्यास स्मृतिकार चुकत नाहींत.

यदि संस्कारपर्याप्तमपि पितृधनं नास्ति तदा पुत्रसमभागितैव दुहितॄणाम्।

—वीरमित्रोदय—व्यवहार, पृ. ५८२

नारदानें तर वडिलार्जित मिळकत जरी अजिबात नसली तरीहि स्वकष्टार्जित मिळकतींतून खर्च करून भावानें बहिणीचें लग्न योग्य तऱ्हेनें केलें पाहिजे असें प्रतिपादिलें आहेः

अविद्यमाने पित्रर्थे स्वांशादुध्दृत्य वा पुनः।
अवश्यकार्याः संस्कारा भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः॥१३·३४

उलटपक्षीं, असेंहि घडणें शक्य आहे कीं एकादें घराणें इतकें संपन्न असावें कीं भावाच्या हिश्श्याचा चौथा हिस्सा बहिणीच्या योग्य विवाहाकरितां लागू नये. अशा वेळीं जर एकादी बहीण लग्नाचा खर्चवेंच वजा जाऊन चौथ्या हिश्श्यांतून जी बाकी उरेल ती आपल्याबरोबर सासरीं नेण्यास जर मागूं लागेल, तर ती मागण्याचा हक्क तिला असूं नये असेंहि आमच्या धर्मपंडितांनीं बजाविलें आहेः

अनूढा इति विशेषोपादानाच्च विवाहार्थं पुत्रभागानुसारि भागहरणं न पुनर्भ्रातॄणामिव दायविभागार्थमिति गम्यते।

—स्मृतिचंद्रिका, व्यवहारकांड, पृ. ६२५

स्मृतिकारांचा हेतु उघड हा होता कीं मुलीच्या लग्नाचा वाजवी खर्च बापाच्या मिळकतींतून व्हावा; चौथा हिस्सा जर अपुरा पडला तर भावांनीं आपल्या हिश्श्यांतून आणखी भर घालावी; जर विवाहाचा योग्य खर्च वजा जातां त्यांतून बाकी उरली, तर ती बहिणींनीं मागूं नये.

## मुलीचा वारसाहक्क कां मान्य केला नाहीं?

धर्मशास्त्रकारांनीं मुलींना भावाबरोबर वारसाहक्क कां दिला नाहीं तें आतां आपण पाहूं. स्मृतिकाळीं वैदिक काळाप्रमाणें विवाह न करणाऱ्या मुली नव्हत्या. सर्व स्त्रियांना सासरीं मालकी हक्क मिळत असल्यामुळें त्यांना जनक-घराण्यांत ते निराळे देण्याची समाजास गरज भासली नाहीं. प्राचीन काळीं गांवच्या लोकांना आपल्या शिवाऱ्यांतील जमीन परगांवच्या लोकांकडे गेली तर फार वैषम्य वाटे. म्हणून ते सहसा तसें होऊं देत नसत. मुलींना जर बापाच्या जमिनींत हिस्सा दिला असता तर परगांवचा मनुष्य गांवच्या जमिनींत वांटेकरी होणें अपरिहार्य झालें असतें. कारण प्रायः फारच थोड्या मुलींचीं लग्नें गांवच्या गांवांत होत. प्राचीन काळीं रेल्वेसारखीं दळणवळणाचीं सुलभ व स्वस्त साधनें नव्हतीं; त्यामुळें परगांवच्या जांवयास दूरगांवच्या जमिनींतील आपल्या बायकोच्या हिश्श्यांची व्यवस्था करणेंहि कठीणच जाई. अशा परिस्थितींत बापाच्या जमिनींत मुलीस हिस्सा मिळण्यानें तिला अगर तिच्या नवऱ्यास फारसा फायदा होणार नव्हता. परस्थ असल्यामुळें उत्पन्नाचा थोडासा भाग त्यांना मिळाला असता. जनक-घराण्याची जी जंगम इस्टेट—सोनें, चांदी, दागिने वगैरे असे, तिजमध्यें लग्नाच्या वेळीं हुंड्याच्या स्वरूपानें अगर दागिन्यांच्या स्वरूपानें तिला योग्य तो वांटा मिळेच.

## बदललेली परिस्थिति

पण हल्लीं परिस्थिति बदललेली आहे व त्यामुळें मुलीच्या वारसा हक्काच्या बाबतींत सुधारणा करणें आवश्यक आहे. प्रथम ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं हल्लीं स्वेच्छेनें म्हणा अगर नाइलाजानें म्हणा, बऱ्याच सुशिक्षित स्त्रिया अविवाहित राहूं लागल्या आहेत. लग्न झालें नसल्यामुळें अशा स्त्रियांना नवऱ्याच्या मिळकतींत हिस्सा मिळत नाहीं, व स्मृति व प्रचलित हिंदु कायदा विरुद्ध असल्यामुळें त्यांना बापाच्या उत्पन्नांतहि हिस्सा मागतां येत नाहीं. तेव्हां अत्र ना परत्र अशी त्यांची स्थिति होते. अशा स्त्रियांना वैदिक काळीं बापाच्या मिळकतींत हिस्सा मिळत असे. हल्लींहि कायद्यांत फरक करून तो त्यांना देणें जरूर आहे. लग्न न करणाऱ्या स्त्रिया प्रायः स्वतः पैसे मिळवणाऱ्या असतात व त्यांच्यावर त्यांच्या विवाहित भावाप्रमाणें स्वतःच्या मुलांबाळांच्या संगोपनाची व शिक्षणाची जबाबदारी नसते. तेव्हां त्यांना जनक—घराण्याच्या मिळकतींत त्यांच्या भावाइतका हिस्सा न देतां अर्धा द्यावा असें

म्हणणें गैरवाजवी होणार नाहीं. प्रस्तावित हिंदु कायद्याप्रमाणें त्यांना भावाइतका हिस्सा देण्याचें योजिलें आहे; पण ज्या अर्थी त्यांची आर्थिक जबाबदारी कमी असते त्या अर्थी त्यांचा हिस्साहि लहान असावा हें म्हणणें योग्य मानावें लागेल. स्मृतिकाळीं स्त्रीशिक्षण लुप्त झालें होतें, पण हल्लीं तें आवश्यक झालें आहे. तेव्हां मुलींना त्यांचें शिक्षण व लग्न याकरितां आपल्या भावाच्या हिश्श्याच्या अर्ध्या भागापर्यंत या खर्चाकरितां हक्कानें भावाकडून पैसे मागण्याचा हक्क असावा.

## विवाहित सभ्रातृक स्त्रिया

पण लग्न न करणाऱ्या स्त्रिया फार थोड्या असतात; तेव्हां मुख्य प्रश्न विवाहित सभ्रातृक स्त्रियांना जनक–घराण्यांत वारसा हक्क असावा का नाहीं हा आहे. १९३६ साली डॉ. देशमुखांनीं जें बिल वरिष्ठ कायदे-कौन्सिलांत मांडलें होतें, त्यामध्यें हा हक्क देण्याचें योजिलें होतें. पण त्या वेळीं लोकमताचा पाठिंबा विशेष न मिळाल्यामुळें तें बिल पास होऊं शकलें नाहीं. राव कमिटीनें आपल्या रिपोर्टांत प्रथम अविवाहित स्त्रियांना अर्धा हिस्सा देण्याचें योजिलें होतें, पण अखेर सर्वच स्त्रियांना भावाच्या अर्ध्याइतका हिस्सा द्यावा अशी शिफारस केली. बिल बनवितांना सरकारनें सभ्रातृक विवाहित स्त्रियांना भावाएवढाच हिस्सा द्यावा असें सुचविलें आहे. हल्लीं या बाबतींत हिंदु समाजामध्यें तीव्र मतभेद आहेत. संपन्न घराणीं मुलींना वारसा देण्याच्या उलट आहेत व ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट ही आहे कीं संपन्न घराण्यांतील ज्या सुशिक्षित स्त्रिया राव कमिटीपुढें साक्षी देण्यास आल्या होत्या त्यांपैकीं बहुसंख्य स्त्रिया सभ्रातृक विवाहित स्त्रियांच्या जनक घराण्यांतील वारसा हक्काच्या उलट होत्या.

मुलींना वारसा हक्क दिला तर निर्व्याज बंधुभगिनीप्रेम नाहींसें होईल, मुली जर मोठ्या इस्टेटीच्या वारस झाल्या तर त्या लफंग्या लोकांच्या कारस्थानास बळी पडतील वगैरेसारखे कांहीं आक्षेप याबाबतींत पुढें करण्यांत आले आहेत, पण त्यामध्यें फारसा राम नाहीं. पैशाच्या लोभामुळें जें बंधुभगिनीप्रेम नाहींसें होणार, तें खरेंखुरें नव्हतेंच असें म्हणणें अधिक योग्य होईल. हल्लींच्या काळीं संपन्न घराण्यांतील मुलींना व त्यांच्या पालकांना आपलें हित चांगलें कळतें. तेव्हां लफंग्या लोकांच्या कारस्थानास अशा कुलांतील मुली बळी पडतील अशी भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं.

## गरीब घराण्यांतील मुली : कर्जाचा वारसा

बहुसंख्य हिंदु समाज गरीबींत आहे हें आपण विसरतां कामा नये. त्यापैकीं बराच भाग कर्जबाजारी असतो हीहि गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. आजकाल आपण मुलींना स्थळें बघतांना सासरची सांपत्तिक स्थिति काय आहे, कर्ज वगैरे तर नाहीं ना, इकडे प्रथम लक्ष देतों. मुलींना जर पैतृक संपत्तींत वारसा मिळाला तर त्यांना संपत्तीबरोबर कर्जाचाहि बोजा उचलावा लागेल, हें निर्विवाद आहे. असें झालें म्हणजे गरीब घराण्यांतील अगर कर्जबाजारी घराण्यांतील मुलींच्या लग्नांत एक मोठीच अडचण उत्पन्न होईल. मुलींना वारसा नसल्यामुळें गरीब घराण्यांतील मुलीशीं लग्न करणाऱ्या जावयास आपणास हुंडा मिळणार नाहीं एवढें माहीत असतें व त्या गोष्टीकडे दुर्लक्ष करण्यास तो तयार असतो. पण मुलींना वारसा मिळाला म्हणजे ज्या मुलीशीं लग्न आपण करणार आहोंत त्या मुलीकडून आपणावर कर्जाचा बोजा तर येणार नाहीं ना, याबद्दल जांवई चौकशी करूं लागतील. सासऱ्यानें जरी त्याबद्दल आश्वासन दिलें, तर तें जांवयास पटेलच असें नाहीं. आणि समजा, आज लग्न ठरविण्याच्या वेळीं मुलीला कर्ज नाहीं अशी खात्री झाल्यावर एखादें लग्न ठरलें व झालें व लग्नानंतर मुलीच्या बापास कर्ज काढावें लागलें तर तें मुलाबरोबर जांवयास व मुलीसहि फेडावें लागेल. मुलगे बापाजवळ राहतात, तेव्हां त्यांना घरीं काय होतें, काय नाहीं, याची सर्व माहिती असते; पण लग्नानंतर मुली सासरीं जातात. तेव्हां त्यांना जनक-घराण्यांत काय चाललें आहे याची विशेष कल्पना नसते. तेव्हां मुलींना वारसा मिळाला म्हणजे लग्न ठरवतांना पुढें मागें आपणांस कर्जभरपाई करावी लागणार नाहीं ना, याबद्दल खात्री झाल्यावर एखाद्या मुलीशीं लग्न करण्यास वर तयार होईल. अशा परिस्थितींत गरीबींतील मुलींच्या लग्नाच्या मार्गांत केवढ्या मोठ्या अडचणी निर्माण होतील याची खरी कल्पना संपन्न

लोकांना येणार नाहीं. आतां हें खरें कीं मुलींना वारसा मिळाला व बापाला कर्ज असलें, तर आपल्या हिश्श्यांतून त्यांना द्यावें लागेल, स्वतःच्या पैशांतून नाहीं. पण कर्जाकरितां जे दावे होतील त्यांत प्रतिवादी म्हणून तरी त्यांना कोर्टाची पायरी चढावी लागेल. असली संभावना पुढें मागें ज्या मुलीशीं लग्न करण्यामुळें येणार असेल, तिच्याशीं लग्न करण्यास बरेच तरुण तयार होणार नाहींत. तेव्हां वारसा हक्क मिळण्यानें ही एक नवी आपत्ति बहुसंख्य स्त्रियांवर येणार आहे. संपन्न घराण्यांतील लोक सुशिक्षित असतात; त्यांना मृत्युपत्र करून आपल्या मुलींना वाटेल ती तरतूद स्वार्जित मिळकतींतून करतां येईल. तेव्हां कायद्यानें वारसाहक्क नसला तरी त्यांचें फारसें नुकसान होणार नाहीं.

## सुस्थितींतील मुली

बिनकर्जबाजारी अगर मध्यम अगर संपन्न स्थितींतील मुलींनाहि हा हक्क मिळून फारसा फायदा होणार नाहीं. अशा घराण्यांमध्यें कांहीं जंगम व कांहीं स्थावर मिळकत असणार. वांटण्या होणार त्या बापाच्या मरणानंतर. आतां आपण अशी कल्पना करूं या कीं एखाद्या मुलीचा बाप तिच्या लग्नानंतर सुमारें दहा वर्षांनीं वारला आणि मग त्याच्या मिळकतीची वांटणी करण्याचा प्रसंग आला आहे; मध्यंतरींच्या दहा वर्षांच्या काळांत मुलगी बरींचशीं सासरीं असणार, त्यामुळें तिला आपल्या पितृगृहीं स्थिति कशी कशी बदलत गेली होती, तेथें भरभराट होत होती का स्थिति खालावत जात होती याची नीटशी कल्पना असणार नाहीं. त्यामुळें वांटणीच्या वेळीं दागदागिने, रोकड वगैरे जी जंगम मिळकत पुढें आणण्यांत येईल, तिजमध्यें खरोखरीच सर्व जंगम मिळकत आली आहे कीं नाहीं याबद्दल नेहमीं शंकाच राहणार. जंगम मिळकत लपवून ठेवणें चलाख भावांना कठीण पडणार नाहीं. आपणांस माहीत असलेले दागदागिने पुढें आले नाहींत व बाहिणीनें 'ते कोठें आहेत.' म्हणून विचारलें तर मध्यंतरींच्या हलाखीच्या काळांत ते विकावे लागले असें उत्तर देऊन भाऊ मोकळे होतील. घरचे दागदागिने विकण्याचा प्रसंग आला तर त्याबद्दल विशेष वाच्यता करण्यांत येत नसते, तेव्हां खरोखरीच जरी ते विकले असले तरी ते बाहिणीस कळलेले नसणार व त्याबद्दल तिला नेहमींच शंका राहणार. उलटपक्षीं, मध्यंतरींच्या दहा वर्षांच्या काळांत जंगम मिळकत नवी कमावली असली तर ती लपवून ठेवणें भावांना कठीण जाणार नाहीं; अशा परिस्थितींत वांटणीच्या वेळीं जंगम मिळकतींत योग्य हिस्सा विवाहित सभ्रातृक स्त्रियांना प्रायः मिळणार नाहीं, किंवा तो मिळाला आहे असें त्यांना पुष्कळदां वाटणार नाहीं.

## मुसलमानी समाजाचा दाखला

स्थावर मिळकतींत मुलींना हिस्सा देण्यानेंहि बरेंच नुकसान व अल्पसा फायदा होणार आहे. आपल्या देशामध्यें हल्लींच जमिनीचे फार बारके तुकडे झालेले आहेत. मुलींना वारसाहक्क देण्यानें या छोट्या तुकड्यांचा आकार एकदम निम्मा होईल. अर्थशास्त्रदृष्ट्या ही एक मोठी राष्ट्रीय आपत्ति होईल यांत शंका नाहीं. मुसलमान–समाजांत मुलींना मुलांच्या निम्मा वारसा मिळतो व त्यामुळें त्या समाजावर झालेले परिणाम ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. हिंदुसमाजामध्यें जमिनदार आहेत, मुसलमानांमध्यें नबाब आहेत; दोन्ही समाजांमध्यें सर्वस्वीं निर्धन वर्गहि आहेत. पण हिंदु समाजामध्यें मध्यमवित्त सुशिक्षित वर्ग आहेत व त्यानेंच आपल्या चळवळीनें व स्वार्थत्यागानें स्वातंत्र्य मिळविलें. मुसलमानी समाजामध्यें हा वर्ग नाहीं व त्यामुळें तो समाज हिंदूंशीं स्पर्धेमध्यें मागें पडला आहे. असा वर्ग मुसलमानांमध्यें नसण्याचें मुख्य कारण म्हणजे मुलींना वारसाहक्क असल्यामुळें संपत्तीचे होणारे असंख्य वांटे हा होय. वक्फाच्या कायद्यानें व भावाच्या मुलीशीं लग्न करण्यास असणाऱ्या अनुज्ञेनें मुलीच्या वारसाहक्कामुळें होणाऱ्या तुकड्यास कांहीं प्रमाणावर मुसलमान–समाज पायबंद घालूं शकला आहे. हे दोन्हीहि मार्ग हिंदु समाजास मोकळे नाहींत हें आपण विसरतां कामा नये. पण राष्ट्रीय आपत्ति टाळण्याकरितांहि स्त्रियांचे वारसाहक्क बुडाविणें हें कोणाहि समाजास शोभत नाहीं असें स्त्री-हक्काचे कैवारी म्हणतील. मुलगे जास्त होऊं लागल्यामुळें, लोकसंख्या वाढल्यामुळें, हे तुकडे वाढतच आहेत ना? मग मुलींना हक्क देण्यानें ते वाढले तर आपण कां खंत बाळगावी? या आक्षेपास उत्तर असें आहे

कीं जरी मुलींच्याकडे जनक-घराण्याच्या हक्काचा जमिनीचा लहानसा तुकडा आला तरी त्यांना त्यापासून फारसा फायदा होणार नाहीं. प्रायः लग्नानंतर शेंकडा ९० स्त्रिया परगांवींच जाणार; त्यामुळें गैरहजर मालकांच्या सदरांतच त्या मोडणार. त्यांना आपल्या जमिनीच्या लागवडीकडे किंवा मशागतीकडे फारसें लक्ष देतां यावयाचें नाहीं; त्यामुळें परगांवीं राहणाऱ्या जमीनदारास जसें थोडेसेंच उत्पन्न मिळतें तसेंच त्यांचें होणार.

बापाची इस्टेट म्हणजे शहरांतील घर असेल तर त्याच्या वांटण्या करणेंहि बरेंच कठीण जाईल. घर बांधलें म्हणजे बहुतेक सर्व घरांतील संपत्ति त्यामध्यें आडून जाते. बहिणींना घरांतील त्यांच्या हिस्स्याचा मोबदला म्हणून रोख रक्कम उचलून देणे भावांना शक्य नसतें. वाडिलार्जित घर बाहिणींच्या हिस्स्याकरितां विकलें जावें असें प्रत्यक्ष बापालाहि वाटत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी एक प्रख्यात प्राच्य-विद्याविशारद पूर्व हिंदुस्थानांत वारले. बडोद्याला सयाजीरावांनीं व्याख्यातें म्हणून बोलाविलें असतांना त्यांनीं तेथें जीं व्याख्यानें दिलीं त्यांमध्यें मुलींना मुलांइतकेच हक्क असावेत असें त्यांनीं प्रतिपादन केलें. पण स्वतः मृत्युपत्र करून हा हक्क त्यांनीं आपल्या मुलींना दिला नाहीं. यास कारण हेंच असावें कीं त्यांचा जो सुमारें दोनतीन लाख रुपयांचा बंगला होता त्यामध्यें मुलींना हिस्सा द्यावयाचा म्हणजे तो विकल्याशिवाय देणें शक्य नव्हतें. आपला बंगला लगेच दहापांच वर्षांत असा विकला जावा असें कोणासच वाटत नाहीं. बंगल्यामध्यें पांचसात भाडेकरी राहतील अशा दृष्टीनें ते बांधलेले नसतात.

विवाहित मुलींना बापाच्या मिळकतींतून वारशानें जी नवीन संपत्ति मिळेल, त्यामुळें त्यांच्या सासरचें एकंदर उत्पन्न वाढणार नाहींच. कारण त्यांच्या नणंदा त्यांच्या नवऱ्यांच्या हिश्शांतील आपला नवीन भाग घेऊन मगच सासरीं जातील. तेव्हां सामान्यतः हल्लींइतकेंच प्रत्येक घराण्याचें उत्पन्न राहील. पण त्यामध्यें अधिक बारके बारके भाग झाल्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत तें कमी मात्र होईल. म्हणजे एकूण बेरीज एकच.

## माहेरचा कमी होणारा ओढा

वरील व्यावहारिक अडचणी सोडल्या तरी तात्त्विक दृष्ट्याहि विवाहित स्त्रियांना त्यांच्या जनक घराण्याच्या मिळकतींत हक्क देणें योग्य होणार नाहीं. लग्नानंतर फार तर एक दोन वर्षें बायकांचा माहेरकडे ओढा असतो. त्यानंतर जशी त्यांना मुलेंबाळें होऊं लागतात, तसें त्यांचें माहेरकडलें लक्ष उडूं लागतें, व स्वाभाविकच सासर म्हणजे आपलें स्वतःचें घर, माहेर म्हणजे परक्याचें घर असें त्यांना वाटूं लागतें. यामध्यें त्यांचा मुळींच दोष नाहीं; असें होणें स्वाभाविक आहे, व तसें होतें म्हणूनच जग चाललेलें आहे. तेव्हां जें सासरचें घर त्यांना आपलें वाटतें त्यामध्यें आपला वारसाहक्क असावा, जें माहेरचें घर त्यांना दूरचें वाटूं लागतें, ज्याच्या व्यवहाराकडे लक्ष ठेवणें त्यांना अशक्य होतें, त्याच्या मिळकतींत त्यांना हक्क असूं नये असें म्हणण्यामध्यें काय वावगें आहे? वारसाहक्क मिळाला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत कसा फायदा होणार नाहीं तें वर दाखविलेंच आहे.

## परित्यक्ता स्त्रियांचा प्रश्न

मुलींना वारसा हक्क असावेत असें जें प्रतिपादण्यांत येतें त्यास एक कारण असें आहे कीं ज्या स्त्रियांना त्यांचे नवरे टाकून देतात त्यांची फार केविलवाणी स्थिति होते हें होय. बापाच्या मिळकतींत वारसा नाहीं म्हणून त्यांना माहेरकडून हक्कानें कांहीं मिळत नाहीं. भाऊ प्रथम कांहीं दिवस मदत करतात. पण त्यांना पुढें तें जड जाऊं लागतें. नवऱ्याकडून पोटगी मागावी तर तो 'बायको मजजवळ नांदण्यास येत नाहीं' या सबबीवर त्या जबाबदारींतून मुक्त होतो. नवऱ्याचें खरें प्रेम उडून गेललें असलें, किंवा त्यानें एखादी वेश्या घरीं आणून ठेवलेली असली, म्हणजे कोर्टांतील त्याच्या वरकरणी आश्वासनावर विश्वास ठेवून कोणती स्वाभिमानी स्त्री पोटाची खळगी भरून घेण्याकरितां त्याच्या घरीं अवांछित बिनपगारी मोलकरीण म्हणून राहण्यास तयार होईल! तेव्हां पोटगी न मिळाली तरी पुरवेल, नवऱ्याच्या घरीं जाऊन अपमानावर डागण्या तरी आणखी नकोत असें स्वाभाविकच तिला वाटतें. अशा परिस्थितीं-

तील स्त्रियांना जर पितृघराण्यांत वारसाहक्क असेल तर तो त्यांच्या फार उपयोगी होईल असें प्रतिपादण्यांत येतें.

परित्यक्ता स्त्रियांची ही अडचण निवारण्याचा खरा मार्ग म्हणजे त्यांस जनक-घराण्यांत वारसाहक्क देणें हा नसून पतिगृहीं त्यांचे हक्क वाढविणें हा आहे असें आम्हांस वाटतें. पितृगृहीं हा हक्क मिळाला तरी तो कसा फारसा उपयोगी होणार नाहीं हें वर दाखविलें आहेच. बायको आपल्याजवळ नांदण्यास येत नाहीं या सबबीवर तिला वाईट तऱ्हेनें वागवणाऱ्या किंवा दुसरें लग्न करणाऱ्या किंवा वेश्या घरीं आणून ठेवणाऱ्या नवऱ्यास तिला पोटगी टाळतां येणें अशक्य करण्यांत यावें. सुदैवानें अशा तऱ्हेचा कायदा फेब्रुआरी १९४९ मध्यें वरिष्ठ कायदेमंडळांत पास झाला आहे. द्विभार्याप्रतिबंधक कायदे मुंबई व मद्रास प्रांतांत पास झाले आहेत व ते लवकरच इतर प्रांतांतहि पास होतील. असें झालें म्हणजे परित्यक्ता स्त्रियांच्या पोटगीचा प्रश्न बराचसा सुटेल. नवऱ्याच्या लहरीपणानें किंवा अयोग्य वर्तनानें जर एखाद्या स्त्रीस विभक्त राहणें अपरिहार्य झालें तर तिला त्याच्या मिळकतींतील तिसरा हिस्सा मागण्याचा हक्क मिळावा. आपल्या स्मृतिग्रंथांनींहि अशा परिस्थितींत हा हक्क पत्नीला दिला आहे हें याज्ञवल्क्यस्मृतींतील ' आज्ञासंपादिनीं दक्षां वीरसूं प्रियवादिनीम्। त्यजन् दाप्यस्तृतीयांशमद्रव्यो भरणं स्त्रियः । [ १·७६ ] ' या श्लोकावरून दिसून येईल. हल्लींहि तो त्यांना देण्याची लगेच तजवीज आपण केली पाहिजे. हा हक्क मिळाला म्हणजे परित्यक्ता स्त्रियांच्या पोटगीचा प्रश्न सुटेल. त्याकरितां त्यांना जनक घराण्यांत हक्क देणें जरूर होणार नाहीं. सामान्यतः शेंकडा ९०।९५ जोडपीं एकत्र राहूनच संसार करितात. शेंकडा ५।१० लोकांकरितां स्त्रियांना वारसाहक्क देऊन जमिनींचे तुकडे कल्पनातीत लहान पाडण्यास मदत करणें दूरदृष्टीचें होणार नाहीं.

कांहीं सुशिक्षित स्त्रिया मुलींना वारसाहक्क मिळण्याबाबत आणखी एक कारण पुढें मांडतात. पुरुषांना जशी जन्मसिद्ध हक्कानें कांहीं संपत्ति आपोआप मिळते, ती मिळण्याकरतां बायकोच्या तोंडाकडे पाहावें लागत नाहीं, तशी स्त्रियांनाहि कांहीं संपत्ति जन्मसिद्ध हक्कानें मिळूं लागली म्हणजे त्यांना पैसे पाहिजे असले म्हणजे प्रत्येक वेळीं नवऱ्याच्या पुढें तोंड वेंगाडावें लागणार नाहीं. तेव्हां तिच्या भावनांकडे लक्ष देऊन तरी मुलींना वारसा हक्क द्यावा असें या पक्षाचें म्हणणें आहे.

पितृसत्ताक कुटुंबांतील आनुवंशिक संस्कारांमुळें पुष्कळदां सुशिक्षित पतीकडूनहि बायको आपल्या खर्चास पैसे मागूं लागली म्हणजे एक प्रकारचें चढेलपणाचें वर्तन होतें; आपण तिच्यावर मोठा उपकार करीत आहोंत अशी भावना त्याच्या मनांत खोल कोठें तरी दडून बसलेली आहे अशी शंका पुष्कळदां सुशिक्षित भावनाप्रधान पत्नीच्या मनांत येते यांत शंका नाहीं. पण पतीकडून असें वर्तन होणें किंवा तसें त्याचें वर्तन पत्नीला वाटणें या दोन्ही गोष्टी त्यांचें वैवाहिक जीवन पूर्ण समरस झालेलें नाहीं एवढेंच दर्शवितात; वारसाहक्कानें त्यामध्यें फारसा फरक पडणार नाहीं. पण वरील प्रकारची नाजूक भावना दुखविली जाऊं नये याकरितां खरा उपाय म्हणजे एक नवीन प्रकारचें स्त्रीधन निर्माण करणें हा होय. पत्नी घराची जोडमालकीण असते म्हणून म्हणा, किंवा तिच्या गृहकृत्याचा, प्रेमाचा मोबदला म्हणून म्हणा, तिला आपल्या पतीच्या उत्पन्नापैकीं अल्पसा भाग, शेंकडा १०% पर्यंत, आपलें स्वतःचें स्त्रीधन म्हणून मिळावें अशी प्रथा पाडावी किंवा कायदा करावा, म्हणजे तिला लग्नसिद्ध हक्कानें दरमहा अगर दरसाल कांहीं रक्कम मिळत जाईल, व तींतून तिला आपला वैयक्तिक खर्च आपला आपण करतां येईल.

तेव्हां एकंदरींत निष्कर्ष असा कीं (१) अविवाहित राहणाऱ्या वृद्ध कुमारिकांना बापाच्या मिळकतींत भावाच्या ½ हिस्सा मिळावा; लग्न झाल्यावर उर्वरित हक्क नष्ट व्हावा. (२) शिक्षण व विवाह यांकरितां प्रत्येक मुलीस आपल्या जनक-घराण्यांतील मिळकतींतून भावाच्या हिश्शाच्या ½ पर्यंत रक्कम मिळावी; व (३) ज्या मुली लग्न करतील, त्यांना आपल्या मिळकतींत हिस्सा असूं नये; पण त्यांचे पतीच्या मिळकतींतील अधिकार वाढवावेत.

श्री. बाळकृष्ण मार्तंड दाभाडे

# प्राचीन भारतीय चित्रकार

*" The rush of interest in the direction of what are understood as worldly advantages has trampled out the sense of pleasure in the beautiful, and the need of its presence as an element essential to the satisfaction of daily life, which must have been unconsciously felt in ages less absorbed in acquiring wealth for itself alone. In olden times our Art Congresses would have been as needless as congresses to impress on the general mind the advantages of money-making would be in these." ( Plain Handicraft, 1892, in " Watts ", p. 36 ). ख्यातनाम चित्रकार वॅट्स यांनीं एका विवक्षित देशाविषयीं व कालाविषयीं केलेलें विधान आपल्या हिंदुस्थानास लागूं केलें तर त्यांतील सत्य कुणालाही पटल्याखेरीज राहणार नाहीं. पाश्चिमात्य राष्ट्रांना जीवनांत कलेची आवश्यकता उत्पन्न झाल्यामुळें चित्रसंग्रह व चित्रविद्यालयें यांची स्थापना करावी लागली; पण भारतीयांना अशा बाह्य कृत्रिम साधनांची जरूरी लागलीच नाहीं. भारतीयांच्या जीवनांत कला मुरून एकजीव झाली होती. कलेसाठीं बाह्य साधनांचा अवलंब करण्याचें त्यांना कारणच पडलें नाहीं. कला, निसर्गाची आवड आणि सौंदर्यसमीक्षा ही भारतीयांच्या जीवनांत भिनून गेली होती. म्हणूनच प्राचीन काळीं आमच्या शिक्षणांत कलांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केलेला आढळून येतो. याच दृष्टीनें Artistic and Industrial Revival in India या ग्रंथांत श्री. ई. बी. हॅवेलसाहेब यांनीं पुढील यथार्थ विधान केलें आहे : " An art which is truly great strikes deep down into national life, and permeates the whole national character. It does not appear only at court-shows and festivals." ( पृष्ठ ५ ). चित्रकलेचा अभ्यास राजे, राजपुत्र, राजकुमारी, सरदार, सभ्य स्त्रीपुरुष इत्यादि लोक धंदेवाईक चित्रकाराप्रमाणेंच करीत असत अशाबद्दल असंख्य उतारे संस्कृत व पाली वाङ्मयांतून काढून दाखवितां येतील. यावरूनच प्राचीन काळीं चित्रकारांचे दोन वर्ग असलेले वाचकांच्या लक्षांत येतील. पहिला वर्ग हौशी चित्रकारांचा व दुसरा वर्ग धंदेवाईक चित्रकारांचा. आजच्या हिंदुस्थानांत पहिल्या वर्गाचा मागमूसही आढळून येत नाहीं हें आमचें दुर्दैव आहे. दुसराही वर्ग फारच रोडावला आहे हें सांगावयासच नको. कोणाहीं सभ्य गृहस्थाच्या—नागरिकाच्या—दिवाणखान्यांत आढळून येणाऱ्या साहित्यांत रंग, वर्तिका, चित्रफलक यांचा हटकून समावेश होत असे असा 'कामसूत्रां'त उल्लेख आहे.[१] 'पादताडितक' या ग्रंथांत एके ठिकाणीं 'खिडकीच्या चौकटीवर ठेवलेल्या रंगपात्राचा' केलेला उल्लेख जरी विषयाला सोडून असला तरी त्यामुळें लेखकाच्या सूक्ष्म अवलोकनाचें कौतुक वाटतें.[२] या व अशाच अनेक उताऱ्यांवरून प्राचीन

---

* प्रस्तुत लेख हा मद्रास येथील Journal of Oriental Research मधील श्री. सी. शिवराममूर्ति यांच्या लेखाचा संक्षिप्त अनुवाद आहे— लेखक

१ कामसूत्र, अध्याय ४–१०

२ पादताडितक, पृष्ठ ३५

काळीं भरतखण्डांत नागरिकांच्या जीवनांत चित्रकलेला केवढें महत्त्वाचें स्थान होतें हेंच सिद्ध होत नाहीं का ?

## कलावन्तांचे वर्ग

Evolution in Modern Art या Frank Rutter च्या पुस्तकांत लेखकानें Post-Impressionism in England या प्रकरणाच्या सुरुवातीस Elie Faure चें पुढील वाक्य उध्दृत केलें आहे :

"In France, the painter is a workman of art at the service of the man of society. In England the painter is a society man who practises painting as an amateur." या वाक्यांत गर्भित विनोद असण्याचा सम्भव आहे. तरी पण ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं फ्रान्स–आणि–इंग्लण्डमधील चित्रकार हे धंदेवाईक चित्रकार आहेत. William Morris हा इंग्लंडमधील चित्रकाराला Gentleman Craftsman म्हणून संबोधितो. कारण इंग्लंडमधील चित्रकार हे सामान्यतः विशिष्ट दर्जाच्या श्रीमंत ग्राहकांसाठीं चित्रें तयार करीत असतात. याच्या उलट फ्रान्समधील चित्रकार हे कोणत्याहि गिऱ्हाइकांसाठीं चित्रें काढतात. प्राचीन हिंदुस्थानांत या दोन्ही प्रकारचे चित्रकार असत ही मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे. एवढेंच नव्हे, तर समाजाचा महत्त्वाचा घटक असणारा सभ्य गृहस्थ हा केवळ हौस म्हणून मनोविनोदनार्थ चित्रकलेच्या व्यासंगांत रममाण होत असे. चित्रकला म्हणजे आनंदांत काळ व्यतीत करण्याचें साधन–विनोदस्थान–होतें. दुसऱ्या प्रकारचे चित्रकार म्हणजे धंदेवाईक चित्रकार होत. चित्रकलेवरच त्यांचें जीवन–त्यांची भाकरी–अवलंबून असे.

## चित्रकारांचा दर्जा

भवभूतीच्या उत्तररामचरितांत रामचंद्राच्या आज्ञेवरून लक्ष्मणानें रामचरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांचें चित्रीकरण करण्याकरतां अर्जुन नांवाच्या चित्रकाराची योजना केल्याचें दाखविलें आहे.[३] जीवनधारणाकरितां ज्यानें चित्रकलेचा आश्रय केला आहे, पण त्या कलेविषयीं ज्याला अत्यंत प्रेम नि आदर आहे अशा सभ्य पण धंदेवाईक चित्रकाराचा 'अर्जुन' हा एक आदर्श आहे. अर्जुनासारख्या चित्रकारांचे आश्रयदाते म्हणजे राजे, महाराजे, सरदार, श्रीमंत, सुसंस्कृत नागरिक असत. अशा धन्देवाईक नामवन्त चित्रकारांचा दर्जा समाजांत बराच वरचा असे. स्थपती आणि चित्रकार यांना त्यांच्या कलेवरील प्रभुत्वामुळें व चारित्र्यामुळें चांगला मान दिला जात असे. बाणाच्या हर्षचरितांत पुढील उल्लेख आहे : राजकुमारी राज्यश्री हिच्या लग्नाच्या वेळीं राजवाड्यांत आणि इतर प्रासादांत चित्रें काढावयास सुरुवात करण्यापूर्वी प्रभाकरवर्धनानें स्थपती आणि इतर कलावन्त यांना पुष्पमाला, चन्दन, वस्त्रें वगैरे अर्पण करून त्यांची योग्य ती सम्भावना केली. अवन्तिसुन्दरी–कथेमध्यें एका शिल्पकाराचा राजानें स्वतः गौरव केल्याचा अशाच रीतीचा उल्लेख आहे.[४] 'तिलकमंजरी'मध्यें धनपाल यानेंही दिलेल्या उदाहरणांवरून त्या वेळीं श्रेष्ठ कलावन्तांचा सत्कार कसा केला जात असे यांची कल्पना येते. सोमदेवाच्या 'कथासरित्सागर' या ग्रन्थांत विक्रमादित्याच्या दरबारांतील राजचित्रकार नगरस्वामी याच्या वैभवाचें व दर्जाचें वर्णन केलें आहे. त्याचा दरबारांत दर्जा सामन्तांच्या बरोबरीचा असून त्याला शम्भर गांवांची जहागिर मिळाली होती. त्या मानानें त्याच्या श्रीमन्तीची व वैभवाची कल्पना होण्यासारखी आहे.[५]

---

३ उत्तररामचरित, अंक १.

४ अवन्तिसुन्दरीकथासार, श्लोक ५२–५३

५ तस्येदशस्य राज्ञश्च नगरस्वामिसंज्ञकः ।
बभूव ग्रामशतभुक् चित्रकृज्जितविश्वकृत् ॥
स द्वयहेन द्वयहेनास्मै राज्ञे प्राभृतपुत्रिकाम् ।
लिखित्वान्यान्यया रूपभङ्ग्या चित्रकरो ददौ ॥
—कथासरित्सागर, अ. १२२, श्लो. २०,२२

'शिल्परत्न' या महत्त्वाच्या ग्रंथांतील 'तस्मादेव सदा पूज्यः स्थापत्यादिचतुष्टयः।' या ओळीवरून वरील विधानाची सत्यता पटते. पण या ठिकाणीं एक गोष्ट मात्र लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, त्या कालीं राजे लोक फक्त नामवंत चित्रकारांनाच आदरानें व मानानें वागवीत असत. सामान्य चित्रकारांचा दर्जा विशेष चांगला असे, असें नाहीं. चित्र, शिल्प, सुतारकाम, धातुकाम, नृत्य, संगीत इत्यादि धंदा करणारे लोक जातीनें क्षुद्र समजले जात. धंदा म्हणून या कलांचा आश्रय करणाऱ्या ब्राह्मणाला श्राद्धनिमंत्रणाला नालायक समजलें जात असे.

प्रतिभाशाली कलावंतांनांच राजदरबारीं काम मिळे. राजाकडे आश्रयार्थ आलेल्या चित्रांचें परीक्षण करण्याचें कार्य यांनाच करावें लागे. तत्कालीन शिक्षणांत कलांचें अध्ययन आवश्यक असल्यानें राजकुमार व राजकुमारी यांना निरनिराळ्या कलांचें शिक्षण देण्यासाठीं अशाच प्रतिभाशाली धंदेवाईक कलावंतांची योजना होत असे. त्यामुळें साहजिकच त्यांना समाजांत मानाचें स्थान प्राप्त होई. राजकुमार हरिवाहन एका राजकुमारीच्या चित्रामध्यें तिच्या सौंदर्याचें तत्त्वशोधन करीत असतां त्याच्या सभोवतीं चित्रविद्योपाध्याय, कलामर्मज्ञ जमून त्याला साहाय्य करीत होते असें 'तिलकमंजरींत' म्हटलें आहे. राजदरबारांत राजा नरवाहनदत्त हा चढाओढींत स्वतः प्रतिभाशाली चित्रकारांचा चित्रकलेंत पराभव करीत असे.[६] राजकुमारी अवन्तिसुन्दरी आणि तिच्या सख्या, राजकुमार चन्द्रापीड (चित्रकर्मणि कौशलमवाप। कादम्बरी, पृष्ठ १५०), राजकुमार हरिवाहन (विशेषतश्चित्रकर्मणि वीणावाद्ये च प्रवीणतां प्राप। तिलकमञ्जरी, पृष्ठ ६५), इत्यादींच्या प्रत्यक्ष उदाहरणांवरून त्या कालीं कलांना किती महत्त्व असे याची सत्यता पटेल. निरनिराळ्या कलांचें अध्ययन हा शिक्षणापैकीं महत्त्वाचा भाग असल्यानें या कलांना आणि कलावन्तांना चांगलाच राजाश्रय असे. कविकुलगुरु कालिदास याच्या 'मालविकाग्निमित्र' या नाटकांत नाट्याचार्यांच्या बरोबरीनें चित्राचार्यांचे महत्त्वपूर्ण उल्लेख आहेत. चित्राचार्यानें राजवाड्याच्या भिन्तीवर राणी आणि तिचा परिवार यांचें यथार्थ चित्र रंगविलें होतें असें स्पष्ट म्हटलें आहे. 'विद्धशालभञ्जिका' या नाटकांत चित्रमन्दिराच्या भिन्तीवर काढलेल्या चित्रांचा उल्लेख असून त्या ठिकाणीं विदूषक चित्रकारांचा बहुवचनांत उल्लेख करतो हें विशेष होय. 'उदयसुन्दरीकथा' या ग्रन्थांत विद्धविजय नांवाचा कुशल चित्रकार राजदरबारीं असल्याचें नमूद केलें आहे. प्रतिष्ठान नगरीचा राजा पृथ्वीरूपाच्या दरबारांत कुमारदत्त नांवाचा एक उत्कृष्ट चित्रकार होता.[७] त्या कालीं एका दरबारांतून दुसऱ्या दरबारांत चित्रकारांची ये-जा होत असे. एवढेंच नव्हे तर उदयसुन्दरीकथेंत एके ठिकाणी योजलेल्या 'प्रतिचित्रकरम्' या शब्दावरून निरनिराळ्या नगरांतून अनेक चित्रकार तेंथें रोज येत जात असत असें दिसतें. कथासरित्सागरांत एके ठिकाणीं कनकवर्ष नगरीच्या राजवाड्याबाहेर रोलदेव नांवाचा विदर्भ देशचा अपूर्व चित्रकार आल्याची वर्दी आहे. यावरून त्या कालीं चित्रकार स्वतःच्या कलाकृतींचें प्रदर्शन करून राजाश्रय मिळावा म्हणून निरनिराळ्या राजदरबारांतून हिंडत असत असें दिसतें. कित्येक प्रसंगीं राजे लोक प्रतिभाशाली चित्रकारांना आपणहून आदरानें पाचारण करून त्यांचेकडून चित्रें काढवून घेत असत. राज्यश्रीच्या लग्नाच्या अगोदर राजवाड्याच्या भिंतीवर चित्रें

---

६ नरवाहनदत्तः स ह्रेपयन् वरचारणान्।
तस्यां प्रियायां नृत्यन्त्यां सर्वातोद्यान्यवादयत्॥
जिगाय चागतान् दिग्भ्यो विविधान् पण्डितांस्तथा।
गजाश्वरथशस्त्रास्त्रचित्रपुस्तादिकोविदः॥
—कथासरित्सागर, लंबक ६, तरंग ८, श्लो. १७१–७२

७ कथासरित्सागर, लंबक ९, तरंग १, श्लोक १२३.

काढण्यासाठीं देशोदेशींच्या चित्रकारांना बोलाविलें होतें असे हर्षचरितांत लिहिलें आहे. अशा नामवंत कलावंतांना राजदरबारांत मानाचें स्थान मिळत असें हें सांगावयास राजशेखराच्या काव्यमीमांसेचा आधार घेण्याची विशेष जरूरी आहे असें मला वाटत नाहीं. अर्थात् ही मानाची व वैभवाची खैरात धंदेवाईक पण प्रतिभाशाली, ख्यातनाम चित्रकारांच्या वांट्यास येई.

कांहीं कालानंतर चित्रकारांचा दर्जा खूपच खालावला. सामान्य कलावंतांना समाजांत मुळींच मान नसे. कारण हे कलावन्त आपलें आयुष्य अत्यंत निकृष्टावस्थेंत घालवीत असत. वेश्यांच्या घरीं जीवन घालवून त्यांच्या सेवेसाठीं यांची कला खर्ची पडत असे. मृच्छकटिकाच्या काळीं सुद्धां सामान्य कलावंत आपल्या कलांचा उपयोग पापान्त सौंदर्य नि आकर्षण निर्माण करण्याकडे करीत असत. परंतु सर्व प्रतिभाशाली चित्रकार अशा स्त्रियांच्या पाशांत सांपडल्याचें उदाहरण आढळून येत नाहीं. आपले दोन प्रियकर फांसे खेळण्यांत रंगून गेले आहेत, अशा अर्थाचें चित्र एक प्रौढ वेश्या काढीत असल्याचा उल्लेख 'पादताडितक' या ग्रंथांत आहे. यावरून वेश्यागृहांत या कलेचा चांगलाच प्रसार झाला होता असें दिसतें. एवढेंच नव्हे तर शिवस्वामीसारख्या नामांकित चित्रकारानें कुसुमावतिका या वेश्येवर प्रेम करावें या घटनेवरून या कलावंतांची नैतिक दृष्ट्या कशी हानि होत चालली होती याचें प्रत्यन्तर येतें. वेश्यांच्या घरांत चित्रकलेचा शिरकाव होण्याचें मुख्य कारण 'आलेख्यादौ व्यसनं वैदग्ध्यख्यातये न तु विनोदाय' असें दामोदरगुप्तानें 'कुट्टनीमता'मध्यें स्पष्ट म्हटलें आहे. आणि क्षेमेन्द्राच्या वेळेस तर चित्रकारांचा एवढा अधःपात झाला होता कीं त्यांच्यावर समाजांत उघड उघड रीतीनें निंदेचे प्रहार होत असत. त्या काळीं या धंदेवाईक कलावंतांची अधोगति एवढी झाली होती कीं त्यांच्या वर्तणुकीवरून व त्यांचें वेश्यागृहीं सतत वास्तव्य यावरून त्यांना क्षेमेन्द्रानें घोडेस्वार आणि महात यांच्या मालिकेंत गोवलें आहे.[8] पण असले उल्लेख एकत्रित करून चित्रकारांच्या अधोगतीचें चित्र रंगविणें म्हणजे दुसऱ्या टोकाला जाण्यासारखें आहे. कलावंतांची नैतिक अधोगति झाली होती असें क्षणभर कबूल केलें तरी त्यावरून त्यांच्या कलेचें हीनत्व मुळींच सिद्ध होत नाहीं. याच्या उलट त्या कलावंतांची कला वरच्या दर्जाची होती असेच उल्लेख विपुल आढळतात. मी तर असें म्हणेन कीं, चित्रकलेचें लोण समाजाच्या खालच्या थरापर्यंतसुद्धां जाऊन पोहोचलें होतें. यांत चित्रकलेच्या गौरवाचाच भाग अधिक नाहीं का? कलावंतांचें खरें कसब हातांत असतें— 'करेषु शिल्पवताम्' हें क्षेमेन्द्रानें सुद्धां कबूल केलें आहे.[9] चित्रकारांच्या शब्दसंग्रहांत हस्तोच्चय या शब्दाचें मोठें महत्त्व आहे. हस्तोच्चय म्हणजे 'कुशल हातानें तयार केलेली उत्कृष्ट कलाकृति' होय.

आतांपर्यंत वर केलेलें विवेचन मुख्यतः चांगल्या चित्राचार्यांना लागू पडणारें असें आहे. पण पूर्वीपासून आपल्या समाजांत रसिकांनीं दुर्लक्षिलेले व समाजानें उपेक्षिलेले अगदीं खालच्या दर्जाचे चित्रकार आहेत. श्यामिलक या चित्रकाराचा उल्लेख 'डिण्डी' या शब्दानें करतो. तत्कालीन कलाभिज्ञ जनता या चित्रकारांच्याकडे आणि त्यांच्या कलेकडे कोणत्या दृष्टीनें पाहात याचें वर्णन केलें आहे.[10] बाजारी

---

८ नीचस्तुरगारोहो हास्तिपकः खलतरोऽथवा शिल्पी। वाञ्छितसकलजनानां तासामपि वल्लभो भवति॥

—कलाविलास, ४,१४

९ स्कन्धतटे सुभटानां हृदये वणिजां करेषु शिल्पवताम्।
गलपत्रांगुलिभंगे छात्राणां स्तनतटेषु तरुणीनाम्॥

—कलाविलास, ७,३१

१० एष खलु प्रद्युम्नदेवायतनस्य वैजयन्तीमभिलिखति। एतांड्डिण्डित्वं नाम भोः। डिण्डिनो हि नामैते नातिविप्रकृष्टा वानरेभ्यः। भोः किञ्च तावदस्य डिण्डिकेषु प्रियत्वम्। डिण्डिनो हि नाम—
आलेख्यमात्मलिखिभिर्गमयन्ति नाशं। सौधेषु कूर्चकमषीमलमर्पयन्ति।
आदाय तीक्ष्णतरधारमयोविकारं। प्रासादभूमिषु घुणक्रियया चरन्ति॥

—पादताडितक, पृष्ठ २१

कलावंताहून यांची योग्यता कमी असे असें 'पादताडितका'वरून दिसतें. जुनीं चित्रें, निशाणें वगैरे दुरुस्त करण्यासाठीं या चित्रकारांची योजना होत असे. या कार्यांत जुनीं चित्रें दुरुस्त होणें दूरच, पण निदान होतीं तशीं झालीं तरी मेहेरबानी म्हणावयाची असाच प्रकार होई. बहुतेक चित्रें अधिकच बिघडलीं जात असत. या ठिकाणीं हॅवेलसाहेबांच्या मार्मिक पण उपरोधी टीकेचें स्मरण होतें. वेरूळसारख्याच अनेक प्राचीन कलाकृती शाबूत राहाव्यात म्हणून सरकारकडून जी खबरदारी घेण्यांत येत आहे, तींत अगदीं सामान्य प्रतिभेच्या कलावंतांची योजना केली जात असल्यामुळें त्या प्राचीन कलाकृतींचें जसें संरक्षण व्हावयास पाहिजे तसें तें होत नाहीं. त्यांतूनहि समाधानाची गोष्ट एवढीच कीं, "We no longer desecrate and destroy the masterpieces of the Moghuls and the monuments of ancient India. We patch them up and try to admire them." प्राचीन कालच्या मूर्तिभंजकांकडून मूर्ती फोडून जें नुकसान झालें असतें त्यापेक्षां या लोकांच्या हातून होणारें नुकसान किंचित् कमी आहे हें खास !

आजकालसुद्धां अशा बाजारी चित्रकलेची वाढ झपाट्यानें होत असलेली आढळून येते. जर्मनीहून छापून येणाऱ्या श्रीकृष्ण व रामचंद्र यांच्या आयुष्यांतील चित्रांत खऱ्या कलेचा मागमूसही आढळून येत नाहीं. उलट अनेक रंगांची खैरात करून सामान्य जनांच्या दृष्टीला फसविण्याचीच कला यांत दिसून येते. अशाच तऱ्हेचे बाजारी चित्रकार त्या काळीं सुद्धां लक्ष्मीचीं चित्रें रेखाटून आपलें पोट भरीत असत. भडक रंग आणि किचकट नक्षीकाम यांच्या संगमांत चित्रवस्तूचें चुकीचें आलेखन दडविण्याचे कसे यत्न केले जात असत याचें श्यामिलकानें यथार्थ वर्णन केलेलें आहे.[११] पण धंदेवाईक कलावंतांच्या कलाचातुरीचें पुढील उदाहरण प्रशंसनीय आहे : एकदां महामल्लपुरांतील देवालयांतील विष्णूचा हात मोडला होता. त्या ठिकाणीं शिल्पकारानें नवीन दुसरा हात तयार करून बसविला. जोडलेल्या हाताचा सांधा सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या मार्मिक कलाभिज्ञालासुद्धां ओळखूं येत नव्हता.[१२] हें कौशल्य पाहून सारी राजसभा आश्चर्यस्तिमित झाली असावी यांत नवल नाहीं. ही गोष्ट धंदेवाईक कलावंतांची झाली. हौशी कलावंतहि याच तोडीचे असत. शाकुंतलाच्या सहाव्या अंकांत सानुमतीचे 'अहो ! राजर्षेर्वर्तिकानिपुणता ! जाने मे सखी अग्रतो वर्तत इति ।' हे उद्गार माझ्या वरील विधानास बळकटी आणतात.

## चित्रकारांचीं स्वभाववैशिष्ट्यें

शूद्रकानें मृच्छकटिकांत रंगपात्रांनीं वेष्टिलेल्या, निरनिराळ्या रंगांत वर्तिका बुडविणाऱ्या चित्रकाराचें शब्दचित्र मोजक्या शब्दांत पण किती बहारीचें वठविलें आहे ! कृष्णचित्रें (Silhouettes) व पत्रच्छेद-चित्रें (paper-cut pictures) तयार करण्यांत जणूं काय आपण गढून गेलों आहोंत असा चित्रकाराचा अभिनय करणाऱ्या व हातांत पत्रकर्तरी घेतलेल्या भट्टपुत्राचें उदाहरण कुट्टनीमतांत आहे[१३]. श्रीहर्षाच्या 'नैषधीयचरितां'त एक वृद्ध चित्रकार एक सुंदर चित्र रंगवीत आहे आणि चित्र चांगलें वठल्याबद्दल समाधान वाटून आनंदानें मस्तक डोलवीत आहे असें वर्णन केलें आहे.[१४] या स्वभाव-

११ वर्णानुरूपोज्ज्वलचारुवेषां लक्ष्मीमिवालेख्यपटे निविष्टाम् ।
सापह्नुतां कामिषु कामयन्तोऽरूपां विरूपामपि कामयन्ते ॥

—पादताडितक, पृष्ठ ३१

मामल्लपुरम् येथील शिल्पावरून लक्ष्मीची लोकप्रियता फार होती या विधानास बळकटी येते.

१२ अवन्तिसुन्दरीकथासार, श्लोक ५२, ५३

१३ पत्रच्छेदमजानञ्जानन् वा कौशलं कलाविषये ।
प्रकटयति जनसमाजे बिभ्राणः पत्रकर्तरीं सततम् ॥

—कुट्टनीमत, श्लोक ७४

१४ नैषधीयचरित १८, १२

वैशिष्ट्याबद्दलचे उल्लेख श्रीहर्षाच्या 'रत्नावली'त, क्षेमेन्द्राच्या 'बृहत्कथामंजरी'त आणि हेमचन्द्राच्या 'कुमारपालचरितां'त अनेक आढळतात.

शाकुन्तल, रत्नावलि, दशकुमारचरित इत्यादि ग्रंथांतील आधारांवरून त्या काळीं चित्रकार रंग, वर्तिका आणि इतर चित्रोपयोगी साहित्य ठेवण्यासाठीं पेट्या (समुद्गक) वापरीत असत असें दिसतें. 'तिलकमंजरी', 'उदयसुन्दरी' इत्यादि ग्रन्थांत, त्या वेळचे चित्रकार आपापलीं चित्रें रेशमी पुठ्यांत मोठ्या काळजीपूर्वक ठेवीत असत, असे उल्लेख आहेत. आपल्या चित्रांवर केलेल्या टीकांचें चित्रकार खेळाडूपणानें स्वागत करीत असत एवढेंच नव्हे तर मार्मिक रसिकांना आपल्या चित्रांतील गुणदोष दाखविण्यासाठीं मुद्दाम आवाहन देत असत.[१५] स्वतः काढलेल्या चित्रांवर त्यांचें एक विशिष्ट प्रकारचें प्रेम—आत्मीयता—असे.[१६]

अभ्यासासाठीं नमुन्याचें आलेखन (experimental sketch) करण्याची त्या काळीं चित्रकारांची पद्धति होती. अशा तऱ्हेचे हस्तलेख तयार केल्यावरच मोठमोठ्या चित्रांचे आलेख्य तयार करीत असत. नैषधीयचरितांत श्रीहर्षानें हस्तलेखाचे अनेक उल्लेख केले आहेत. आणि त्यावरील नारायणाच्या टीकांत त्यांचे अर्थ किती सुरेख रीतीनें व्यक्त केले आहेत! दामोदरगुप्तानें 'कुट्टनीमतां'त 'वर्णक' या शब्दाची योजना केली आहे[१७]. 'वर्णक' म्हणजे नक्की हस्तलेख अथवा सूत्रपातरेखा नव्हे; तरी पण दोन्हींचाही बराचसा अंश वर्णकांत असतो. वर्णक म्हणजे तयार होणाऱ्या चित्राचें स्वरूप समजण्यासाठीं केलेला छोटासा नमुना होय. एक टीकाकार वर्णकाचा अर्थ 'अनुकरणार्थम् मूलभूतं चित्रम्' असा करतो. वर्णकाची तुलना रस्किनच्या determinant sketch बरोबर करतां येईल. या चित्रावरून (being the expression of concluded operations of mind drawn slowly, not so much a sketch as a map.) प्रथमच्या वर्णकाची अथवा determinant sketch ची कल्पना येईल. या वर्णकाचा अथवा वर्णिकाचा संस्कृत वाङ्मयांत अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो.

चित्र-उन्मीलन म्हणजे चित्रांत जीवकळा ओतणें. चित्रांतील व्यक्तींचे नेत्र रेखाटणें, पापण्या काढणें इत्यादि गोष्टी चित्रकार नेहमीं शेवटीं करीत असे. चित्र पुरें करतांना, चित्रावर शेवटचा हात फिरवितांना या गोष्टी रेखाटण्याची प्रथा असे. राजानक रत्नाकराच्या 'हरविजय' ग्रंथांतील एक उल्लेख या दृष्टीनें अत्यन्त महत्त्वाचा आहे.[१८] आपापलीं निवासस्थानें सोडून पळून गेलेल्या शत्रु—राजांच्या राजवाड्यांतील भिन्तीवरील चित्रांविषयींचा तो उल्लेख आहे. भिन्तीवरील तीं चित्रें जवळजवळ पुरीं होत आलीं होतीं. फक्त त्यांवर चित्रकाराचा शेवटचा हात फिरावयाचा राहिला होता. त्यामुळें नेत्ररेखनाच्या अभावानें तीं चित्रें अनुन्मीलितच राहून गेलीं

---

१५ 'कुमार! अस्ति किंचिद्दर्शनयोग्यमत्र चित्रपटे रूपम्? उद्भूतरूपः कोऽपि दोषः वा नातिमात्रं प्रतिभाति। अद्याप्यनुपजातपरिणतिश्चित्रविद्यायां शिक्षणीयोऽहमखिलशास्त्रपारगेण महाभागेन इति।'

—तिलकमञ्जरी, पृष्ठ १३५

१६ आत्ममये महति पटे विविधजगच्चित्रमात्मना लिखितम्।
स्वयमेव केवलमसौ पश्यन् प्रमुदं प्रयाति परमात्मा॥

—स्वात्मनिरूपण, श्लोक ९५

१७ कुट्टनीमत, १७७

१८ यस्याभियाति भवनेष्वसमाप्तचित्र—संभारभित्तिपुरुषा मलिनीभवन्तः।
उन्मीलनावसरशून्यदृशः समिद्धां दध्युर्दिवानिशामिव श्रियमव्यवस्थाम्॥

—हरविजय, १६, ६५

होतीं! राजानक अलक या टीकाकारानें यावर केलेली टीका मार्मिक आहे.[१९]

त्या वेळचे सामान्य चित्रकार, प्रतिभाशाली चित्रकारांच्या उत्कृष्ट चित्रांचें अनुकरण—नक्कल—करीत असत असें 'मृच्छकटिका'वरून दिसतें. अर्थात् चांगल्या चित्रांच्या नकला केल्यास विशेष बिघडतें असें नाहीं. पण ही प्रथा सर्व्हा चालू होती असें नाहीं. नलचम्पूकार लिहितात कीं, 'चित्राचे विषय आणि प्रसंग महाभारतांतील शब्दचित्रांप्रमाणें अनन्त आहेत', आणि चित्रांत मुख्यतः चित्रकारांच्या अपूर्ववस्तुनिर्माणक्षम अशा बुद्धीलाच प्राधान्य आहे. असें जरी असलें तरी तिच्या अभिव्यक्तीला अभ्यासाची जोड नसेल तर त्या प्रतिभेचें तेज पडणार नाहीं. आजच्याप्रमाणेंच चित्रकलेचे नियम झुगारून देऊन अभूतपूर्व चित्रें रेखाटणारे प्रतिभाशाली चित्रकार (?) त्या काळींहि होते. अशा चित्रकारांना चित्रकलेच्या प्रान्तांत अभ्यासाशिवाय हवा तो गोंधळ घालतां येऊं नये म्हणून चित्रकलेचा प्राथमिक शास्त्रीय अभ्यास आवश्यक होता. आणि तेवढ्याचसाठीं 'चित्रसूत्रां'ची आवश्यकता होती. या चित्रसूत्रांच्या अभ्यासानें अगदीं सामान्य बुद्धीचा चित्रकार सुद्धां यांत्रिक पद्धतीनें कां होईना पण ओळखूं येतील अशीं बऱ्यापैकीं चित्रें काढूं शकत असे. अर्थात् अत्यंत प्रतिभाशाली चित्रकारांना या नियमांचें बंधन नसे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. तरी पण असले प्रतिभाशाली चित्रकार चित्रकलेच्या मूलभूत तत्त्वांचें उल्लंघन न करतां विविध प्रकारचीं व विविध पद्धतीचीं चित्रें काढीत असत. 'कुट्टणीमता'नें ज्या 'चित्रसूत्रां'चा उल्लेख केला आहे, त्या ग्रंथाचा नक्की बोध होत नाहीं. परंतु दामोदरगुप्ताचा काळ आणि ग्रंथावरून अभ्यास करण्याची ती पद्धति पाहिली म्हणजे 'विष्णुधर्मोत्तरा'-मधील चित्रसूत्रांचा कुट्टणीमतानें उल्लेख केला असण्याचा अधिक संभव संभवतो. विष्णुधर्मोत्तराची रचना गुप्तकालांत झाली असावी असें Dr. Stella Kramrisch यांचें मत आहे. शिवाय 'चित्रसूत्र' या नांवाचा अजून एकहि ग्रंथ उपलब्ध झाला नाहीं. तेव्हां 'विष्णुधर्मोत्तरां'मधील चित्रसूत्रेंच अभिप्रेत असावींत असेंच धरून चालण्यास हरकत नाहीं.

प्रतिभाशाली चित्रकारांच्या चित्रांचा अनुकार करणें ही कांहीं काळपर्यंत तरी इष्ट अशीच गोष्ट आहे. पण त्याचा उपयोग जरूरीपुरताच व योग्य तेवढाच करावयास पाहिजे. कुणाचाहि अनुकार करावयाचा नाहीं असें ठरविलें तर कोणत्याहि कलेला बाल्यावस्थेच्या पुढें पाऊल टाकतां येणेंच शक्य नाहीं. पूर्व कलावंतांच्या ऋणाशिवाय का चित्रकार उदयास येत असतो? पहिल्या ज्ञानाच्या मदतीनेंच प्रगतीचें पाऊल पुढें पुढें पडत असतें. पूर्वज्ञानाच्या अनुकारांतून नवीन ज्ञानाचा उदय होतो. आज जगाची उत्क्रांति याचमुळें झालेली आहे. तेव्हां कांहीं विशिष्ट काळपर्यंत अनुकार करणें हें चित्रकारांस हितावह होतें. सुप्रसिद्ध कलावंत Sir Joshua Reynolds हे आपल्या सहाव्या व्याख्यानांत लिहितात

"But to bring us entirely to reason and sobriety, let it be observed that a painter must not only be of necessity an imitator of the works of nature, which alone is sufficient to dispel this phantom of inspiration, but he must be as necessarily an imitator of the works of other painters. This appears more humiliating, but is equally true, and no man can be an artist, whatever he may suppose, upon any other terms." असें जरी आहे तरी यापासून कित्येक वेळेला अतिरेकामुळें प्रतिभेचा नाश होऊन यांत्रिकता निर्माण होण्याचा संभवहि बराच असतो. प्राचीन चित्राचार्यांच्या चित्रांचें अर्थशून्य अनुकरण व नक्कल करण्याच्या प्रथेबद्दल कॉन्स्टेबल हा Archdeacon Fisher याला एका खाजगी पत्रांतून लिहितो—"The art will go out; there will be no genuine painting in England in thirty years. This will be owing to pictures driven into the empty heads of the junior artist

१९ यस्यारिवेदमस्वधर्मसम्पन्नाश्चित्रपुरुषा इवोन्मीलनाभावादस्थिरां लक्ष्मीमचिन्तयन्।

by their owners, the directors of the British Institution, etc." चित्रकलेच्या बाल्यावस्थेंत निसर्ग हाच चित्राचार्यांचा गुरु–आदर्श–होता, त्यावेळीं चित्रें हीं उदात्त नि अधिक परिणाकारक होतीं. पुढें कालांतरानें Raphael व Claude अशासारख्यांचीं चित्रें आदर्श म्हणून समजूं लागले. त्यांच्या पद्धतीच्या साहाय्यानेंच चित्रकारांची प्रतिभा नव्या अपूर्व वस्तू निर्माण करूं लागली. पण आजची स्थिति काय आहे ? "Could you but see the folly and ruin exhibited at the British Gallery, you would go mad. Vander Velde, and Gaspar Poussin, and Titian are made to spawn multitudes of abortions; and for what are the great masters brought into this disgrace? Only to serve the purpose of sale. Hofland has sold a shadow of Gaspar Poussin for eighty guineas, and it is no more like Gaspar than the shadow of a man on a muddy road is like himself." इतक्या कडक शब्दांत टीका करणारा कॉन्स्टेबल सुद्धा पुढें मुद्दाम टीप देऊन हा दोष British Iustitution ला देत नाहीं; सवलतीचा दुरुपयोग करणाऱ्यालाच तो अपराधी ठरवितो. हेतुशून्य व यान्त्रिक पद्धतीनें नकला करण्याच्या या संवयीबद्दल रस्किन आपल्या Political Economy of Art (Lecture II, Accumulation) या ग्रंथांत लिहितो : "All copies are bad; because no painter who is worth a straw ever will copy. He will make a study of a picture he likes for his own use, in his own way, but he won't and can't copy."

सामान्यतः कलाकृति पूर्ण करण्याच्या बाबतींत कलावन्त आळशी दिसतात, या विधानाला प्राचीन काळचे कलावन्त अपवाद होते असें नव्हे. आणि म्हणूनच क्षेमेन्द्र हा अशा कलावन्तांना 'कालचौर' असें संबोधून हसतांना दिसतो.[२०] क्षेमेन्द्राच्या कालापर्यन्त चित्रकार आणि इतर कलावन्त हे कलादृष्ट्या नसले तरी नैतिकदृष्ट्या बरेच घसरगुंडीला लागले होते. शिवाय या आळशीपणांत भर पडण्याचें दुसरेंही एक कारण आहे. त्या वेळीं रोजच्या कामाबद्दल रोज मुशाहिरा मिळत असे. वस्तुपालाच्या आज्ञेवरून तेजपालानें अबूच्या पहाडावर जें अपूर्व सुंदर देवालय निर्माण केलें त्या वेळच्या प्रसंगाचें मोठें मार्मिक वर्णन 'वस्तुपालप्रबंध' या ग्रंथांत केलेलें आढळतें. अर्थात् ही मानवी प्रवृत्ति सार्वकालीनच आहे. कलावंतांच्या विशिष्ट सवयींचें जें बारीक वर्णन केलें आहे तेंही वाचनीय आहे. या कामावर देखरेख करण्यासाठीं शोभनदेव या कलावंताची योजना केली होती. ऊदल नांवाच्या गृहस्थाच्या ताब्यांत पैसा देऊन तो योग्य कारण पाहून हवा तेवढा खर्च करण्याची त्यास परवानगीही देऊन ठेविली होती. एकदां तेजपाल धोलक गांवाला गेला असतां ऊदल त्यास लिहितो, "सारे कामगार काम करीत नाहींत, विनाकारण वेळ दवडतात, अगोदर पैसे मागतात. पैसे दिले कीं खर्चून बसतात व परत पैशाची मागणी करतात.' उदार अंतःकरणाचा तेजपाल यावेळीं उत्तर लिहितो– "या कलावंतांना पैसे पुरविण्याच्या बाबतींत कृपणपणा करूं नका. त्यांना हवे असतील तेवढे पैसे द्या." एकदां देवालयाचें काम जवळ जवळ संपूर्ण होत आलें असतांना आपली कलामर्मज्ञ पत्नी–अनुपमा–हिच्यासह तो तिथें आला होता. मंदिरांतील कांहीं प्रेक्षणीय स्तंभ अजूनहि बसविण्यांत आले नव्हते. अनुपमेनें त्याचें कारण विचारतां शोभनदेव म्हणाला– 'या डोंगराची हवा अत्यंत थंड आहे. आमच्या स्नानाची व जेवणाची थोडीफार गैरसोयहि होत आहे.' शोभनदेवाच्या बोलण्याचा आशय अनुपमेच्या लक्षांत येण्यास वेळ लागला नाहीं. तिनें

---

२० प्रत्यहवेतनयुक्ताः कर्मसु ये कारुशिल्पिनो धूर्ताः।
विलसन्ति कार्यविघ्नैर्विज्ञेयाः कालचौरास्ते ॥

—कलाविल १०, २५

रात्रपाळीसाठीं व दिवसपाळीसाठीं निरनिराळे कामगार लावण्याची योजना सुचविली आणि प्रत्येक कामगाराला भरपूर विश्रांति व गोड पक्वान्नें मिळण्याची सोय केली. याचा परिणाम योग्यच झाला. या अपूर्व मंदिराचें कार्य उत्कृष्ट रीतीनें शेवटास गेलें. आजहि हें मंदिर साऱ्या भरतखंडाचें अभिमानाचें स्थान होऊन बसलें आहे. बाहेरून जरी कलावंत आळशी दिसले तरी त्यांची कल्पनाशक्ति सारखी कार्य करीत असते. कोणतीहि कलाकृति क्षणार्धांत निर्माण होऊं शकत नाहीं. तिच्यामागें पुष्कळ वर्षांची मूक तपश्चर्या उभी असते. कलावंताची प्रतिभा अविरत उद्यमशीलच असते. तिला विश्रांतीची कल्पनाहि नसते. पण अशा कलावंतांचे हात प्रत्यक्ष हालचाल करीत असल्याचें दिसत नाहीं. एवढ्याचवरून आपण त्यांना निष्क्रिय समजणें चूक नाहीं का होणार? याच वेळीं लिओनार्डोच्या आयुष्यांतील एका प्रसंगाची मला आठवण होते. मिलनमध्यें असतांना लिओनार्डो Last supper (अन्त्य भोजन) हें जगत्प्रसिद्ध चित्र रंगवीत होता. आपल्या गुरूशीं कृतघ्न धेऊन त्याचें नांव कोण सांगेल हें समजण्यासाठीं सर्वजण आतुर होऊन बसले आहेत, असा तो देखावा होता. लिओनार्डो हा प्रतिभाशाली चित्रकार असला तरी जलद गतीनें चित्रें रंगवूं शकत नव्हता; त्याला लागणारा विलंब 'प्रायर'ला सहन झाला नाहीं. त्यानें ड्यूकजवळ चुगली करून चित्रकारास कानपिचक्या देण्याबद्दल ड्यूकचे कान भरले. ड्यूकनें वेळ साधून चित्रकारास विलम्बाचें कारण विचारलें. लिओनार्डो शांतपणें उत्तरला— 'चित्र रंगविण्यापूर्वीं चित्रकाराला खूप विचार करावा लागतो. आतां फक्त दोनच आकृती आणि त्यांतहि फक्त चेहरेच रंगविण्याचे राहिले आहेत. येशूचें मुख कसें रंगवावें याची मला अजून कल्पनाच सुचत नाहीं. दिव्य दैवी सौंदर्य कसें व्यक्त करावें याबद्दल मी मूढ होऊन गेलों आहे. जो दुसरा चेहरा मला त्रास देत आहे तो ज्यूडासचा होय. आपल्या गुरूनें आपल्यावर उपकारांचे डोंगर रचले असतां कृतघ्न होणाऱ्या ज्यूडासचें मुख कसें असेल, ही कल्पना सुद्धां अजून अकल्पनीयच राहिली आहे. पण वेळ वांचविण्यासाठीं मी आतां उगीच विचार करण्यांत वेळ न घालवितां ज्यूडासच्या ठिकाणीं 'प्रायर'चा चेहराच काढतों झालें"! या उत्तरानें ड्यूक पोट दुखेपर्यंत हंसला. मग ड्यूकनें प्रायरला तंबी देऊन लिओनार्डोस त्याच्या स्वेच्छेप्रमाणें काम करण्यास पूर्ण मुभा देण्याबद्दल बजाविलें. (The Outline of Art by Sir William Orpen, पृष्ठ ६०–६१).

प्रतिस्पर्धी चित्रकारानें आव्हान दिल्यानें चित्रकाराच्या कौशल्याची परिसीमा व्यक्त होत असे. अशा वेळीं चित्रकार वेडानें भारावल्यासारखा काम करीत राहून आपल्या प्रतिभाबलानें अपूर्व सृष्टि निर्माण करण्याची पराकाष्ठा करीत असे. अशा प्रसंगीं त्याची कला कसास लागून प्रकर्षानें पल्लवित होई.

आतांपर्यन्त वर भारतीय चित्रकारांच्या स्वभावधर्माचें थोडेंफार वर्णन केलें आहे, त्यांत एक गोष्ट मात्र विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं त्या चित्रकारांना आजच्यासारखें प्रसिद्धीचें वेड नव्हतें. त्या चित्रकारांनीं आपल्या कलाकृतीवर आपल्या नांवाचा निर्देश मुळींच केलेला नाहीं त्यांच्या कलाकृतीच्या मागें आध्यात्मिक हेतु असे. त्यांची प्रत्येक कृति ही भक्तिभावानें परमेश्वराच्या चरणीं अर्पण केली जात असे. ही धार्मिक भावना मुळाशीं असल्यानें त्या कृतींतून एक प्रकारचें धार्मिक वातावरण आढळून येई. कला हा एक प्रकारचा योग असून या योगाच्या साधनानें परमेश्वराची प्राप्ति करून घ्यावयाची असते हें प्राचीन चित्रकार विसरूं शकत नसे. भगवत्पाद श्रीशंकराचार्य यांनीं एका श्लोकांत हेंच सांगितलें आहे कीं शिल्प (यांतच सर्व ललितकलांचा समावेश होत असे) आणि इतर सर्व मानवकृती या सर्व परमेश्वराच्या सेवेसाठीं व्हावयास पाहिजेत. ते म्हणतात :

जपो जल्पः शिल्पं सकलमपि मुद्राविरचना
गतिः प्रादाक्षिण्यक्रमणमशनाद्याहुतिविधिः ।
प्रणामः संवेशः सुखमखिलमात्मार्पणदृशा
सपर्यापर्यायस्तव भवतु यन्मे विलसितम् ॥

—सौंदर्यलहरी, २७

# घे रूप आतां !

आम्ही केला यज्ञ केली तपश्चर्या
आहुति दिली रक्ताची देहांची
शतकें विरलीं
अनंतत्वांत.

भारावले डोळे वाट पाहुनि
दमल्या नेत्रांच्या शिणल्या बाहुल्या
स्थिर जाहल्या.

आणि एकदांचि पातलीस तूं
आलीस तूं; पण......
हाडें पदतलीं चूर्ण करीत
छिन्नविच्छिन्न
शिराविना देह
गळ्यांत घालून नरमुंडमाला
दशहस्तांतील अस्त्रें रक्तस्नात
डमरू वाजे तांडव घुमे
अणूअणूंत घोरसंग्राम.
पातलीस तूं आलीस पण......
तूं महाकाली !

* * *

पुनः झाला यज्ञ आहुत्या अमोल
पृथ्वीमोलाच्या
आतां तरी घे घे रूप दुजें
स्तब्ध बाहुल्या तमांत विरल्या
घे रूप दुजें.

ये उधळित मंगलाक्षता
आण हातांत शांत नंदादीप
बालसूर्याचें हास्य विलसूं दे

तेजस्विनी, तुझ्या कमलमुखीं
भालप्रदेशीं उगवो सूर्य कुंकुमतारा.
घे रूप दुजें—
हिरवा शालू लेवून घेऊन सौभाग्यलेणीं
अक्षय्य घुमव बांसरी सूर
प्रेम-नृत्याचे
आणि फुलूं दे पदतलीं तुझ्या
ताजीं ताजीं सुमें
नवजीवनाचीं
ज्यांत भरलीं-
निरामयसत्त्व सुवाससौन्दर्य
अदम्य मानव्य
मांगल्य नव्हाळीं
घे रूप आतां———
सौभाग्यलक्ष्मीचें*

—य. द. भावे

* 'आर्द्रा' या आगामी काव्यसंग्रहांतून.

---

# ते के न जानीमहे !

अन्याच्या विपरीतशा अनुभवें घेती धडा, सुज्ञ ते
जे कां स्वानुभवें स्वदोष त्यजिती, सामान्य ते जाणते
ठेंचा खाउनिही सुधारति न जे, ते मूर्ख वेडे खुळे
होती 'चीत' परी 'जितं' म्हणविती ते कोण कीं नाकळे ॥

—च. अ. भोगडे, सोलापूर

श्री. बा. रं. सुंठणकर

# मार्क्सच्या भौतिक इतिहासवादाचा आद्य जनक

इतिहास हें शास्त्र आहे कीं कला आहे हा वाद केव्हांच मागें पडला असून इतिहास हें एक शास्त्र आहे हें सर्वमान्य झालें आहे. इतिहासाला इतर भौतिक शास्त्रांचा दर्जा प्राप्त झाला असून इतिहास-शास्त्र हें समीक्षणात्मक शास्त्र आहे असें मानलें जातें. इतिहाससमीक्षेच्या अनेक उपपत्ती आजपर्यंत मांडण्यांत आल्या आहेत. मानवजातीच्या इतिहासांत प्रारंभापासून ज्या घटना घडत आल्या आहेत त्यांच्या मुळाशीं कांहीं तत्त्वें आहेत काय आणि असलीं तर तीं कोणतीं आहेत, मानवेतिहास हा दैवी संकेत, यदृच्छा, भौतिक किंवा इतर कोणतीं कारणें यांमुळें घडला आहे, याविषयीं अनेक विचारवंतांनीं साधकबाधक ऊहापोह केला आहे. त्यांच्या विचार-मंथनांतून निरनिराळ्या पद्धती जन्माला आल्या आहेत. या पद्धतींतून इतिहासाविषयींचें तत्त्वज्ञान निर्माण झालें आहे. ऐतिहासिक घटना कोणत्या मूलभूत कारणांनीं घडतात याची मीमांसा करणें हें या तत्त्वज्ञानाचें उद्दिष्ट असतें. या मीमांसेला इतिहासवाद हें नांव देतां येईल. इतिहासवाद इतिहासाच्या बुडाशीं असणारें तत्त्वज्ञान विशद करून सांगतो.

## इतिहासवादांतील दोन पक्ष

आपल्या देशांत भौतिकशास्त्रांची जशी उपेक्षा होत आली आहे तशीच ती इतिहासशास्त्राची पण झाली आहे. त्यामुळें येथें इतिहासवाद तयार होऊं शकला नाहीं. इति-ह-आस एवढ्या शब्दार्थावरच भारतीयांची इतिहासाची कल्पना टांगून राहिली आहे. त्यापुढें ती जाऊं शकली नाहीं. पाश्चात्त्यांनीं इतिहासवादांत खूपच प्रगति केली आहे. इतिहासाचें व्यवस्थित असें शास्त्र त्यांनींच तयार केलें आहे. या शास्त्रांतून इतिहासवादाचें जे सिद्धांत पुढें आले आहेत त्यांत मुख्यतः दोन पक्ष पडतात. एक अध्यात्मवादी आणि दुसरा भौतिकवादी. भौतिक-वाद्यांत पुनः अनेक पंथ आहेतच. अध्यात्मवाद्यांचें म्हणणें असें कीं इतिहास जो घडत असतो तो दैवी संकेतानुसार किंवा चिच्छक्तीच्या प्रेरणेनुसार घडत असतो. जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल हा या अध्यात्मवाद्यांचा अध्वर्यु समजला जातो. हेगेलच्या मताप्रमाणें इतिहासाच्या मुळाशीं विश्वशक्ति किंवा विश्वप्रज्ञा असते आणि तिच्या प्रेरणेनें इतिहासाची प्रक्रिया घडत असते; तिचा आविष्कार जगदितिहास होय. भौतिक-वाद्यांचें प्रतिपादन असें कीं इतिहास हा मानवी कारणांनीं घडत नसून भौतिक कारणें हीं त्याचीं प्रेरक असतात. इतिहासाच्या मागें ज्या शक्ती असतात त्या निसर्गजन्य किंवा मानवजन्य असतात आणि विशिष्ट नियमानुसार त्या कार्य करीत असतात आणि इतिहास हा त्यांचा परिणाम असतो. भौतिकवाद्यांत कार्ल मार्क्स याची पद्धति सर्वांत अधिक शास्त्रशुद्ध आणि व्यापक व निश्चित स्वरूपाची आहे. भौतिक इतिहासवाद (Materialistic Interpretation of History) या नांवानें ती प्रसिद्ध आहे. मार्क्सचा इतिहासवाद एकाएकीं उद्भूत झाला असें नव्हे तर मार्क्सच्याहि पूर्वीं कांहीं शतकें त्याचा सांगाडा तयार होत होता. मार्क्सच्या अगोदर दीर्घ काळ जी एक वैचारिक प्रक्रिया चालू होती. तिचें परिणत फळ म्हणजे मार्क्सचा इतिहासवाद होय. मार्क्सनें भौतिक परिस्थिति आणि मानवी जीवन यांचा परस्पर-संबंध दर्शविला. मानवाचें जीवन आणि विचार हीं भौतिक परिस्थितीवर अवलंबून असतात आणि

त्याबरोबरच त्या परिस्थितीवरहि परिणाम करीत असतात. मानव आणि परिस्थिति यांच्या आघात-प्रत्याघातांतून जी अविरत क्रिया चालू असते, तोच इतिहास होय. मानवाच्या भौतिक परिस्थितीला उत्पादनाच्या पद्धतींतून असा निश्चित अर्थ मार्क्सनें दिला. उत्पादनाच्या पद्धतींतून—योगक्षेमाच्या पद्धतींतून मानवी संबंध निर्माण होतात आणि मानवाची विचारपद्धति बनत असते असा अन्योन्य संबंध दिग्दर्शित करून मानवेतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे असा निष्कर्ष त्यानें काढला. मार्क्सच्या इतिहासवादाचा महत्त्वाचा विशेष हा आहे कीं त्यानें ऐतिहासिक प्राक्रियेचें कर्तृत्व मानवाकडे दिलें. मानव हाच स्वतःचा इतिहास घडवीत असतो असें त्यानें ठांसून सांगितलें. असें सांगणारा मार्क्स हा पहिला पुरुष नव्हता. मार्क्सच्या आधीं सुमारें १५० वर्षें एका इटॅलियन तत्त्ववेत्त्यानें हेंच तत्त्व घोषित केलें होतें. व्हिको हें त्या तत्त्ववेत्त्याचें नांव होय. १८ व्या शतकाच्या प्रारंभींच 'मानवजात ही मानवाची स्वतःची निर्मिति आहे' (Humanity is its own creation) हा सिद्धान्त व्हिकोनें प्रस्थापित करून मार्क्स आणि एंगल्स यांच्या भौतिक इतिहासवादाची मुहूर्तमेढ रोंविली. म्हणून व्हिको हा भौतिक इतिहासवादाचा आद्यजनक होय.

### व्हिकोचा जीवनवृत्तान्त

गिओव्हानी बतिस्ता व्हिको हा इटलीचा एक मोठा कायदेपंडित आणि तत्त्वज्ञानी होऊन गेला. त्याचा जन्म नेपल्स शहरीं २३ जून १६६८ रोजीं झाला. त्याची घरची परिस्थिति गरीबीची होती. पण लक्ष्मीची उणीव त्यानें सरस्वतीदेवीची आजन्म उपासना करून भरून काढली. विद्यार्थिदशेपासूनच तो विद्याभ्यासांत हुशार होता. विश्वविद्यालयीन शिक्षणांत त्यानें अनेक विषयांत प्रावीण्य संपादन केलें. कायदेशास्त्राचा त्याचा अभ्यास दांडगा होता. इतिहास, तत्त्वज्ञान आणि साहित्यशास्त्र यांचाहि त्याचा व्यासंग सखोल होता. विद्यापीठांत असतांनाच बहुश्रुत पंडित म्हणून त्यानें नांव कमाविलें होतें. त्याचें शिक्षण संपतांच इश्चियाच्या धर्माधिकाऱ्याच्या पुतण्याचा शिक्षक म्हणून त्याची नेमणूक झाली. व्हिकोच्या या विद्यार्थ्याचें वास्तव्य स्पेनमधील एका कोपऱ्यांतील व्हातोला या किल्ल्यांत असल्यामुळें त्याला तेथेंच जाऊन रहावें लागलें. जगापासून दूर अशा या ठिकाणीं व्हिकोनें एकंदर नऊ वर्षें काढलीं. या काळांत त्यानें व्यासंग मात्र जबर केला. विशेषतः ग्रीक आणि लॅटिन वाङ्मयाचा त्यानें कसून अभ्यास केला. प्लेटो आणि टॅसिटस् हे त्याचे आवडते ग्रंथकार होते. प्लेटोचा आदर्श ध्येयवाद आणि टॅसिटसची वास्तवता या दोन्हींनीं तो सारखाच भारून गेला होता. तो म्हणत असे कीं "प्लेटो हा आदर्श मानवाचें चित्र उभें करतो आणि टॅसिटस हा मानव जसा आहे तसेंच त्याचें चित्रण करतो म्हणून मला हे दोघेहि फार आवडतात."

व्हातोला येथें नऊ वर्षें काढल्यानंतर तो पुनः नेपल्सला आला. या ९ वर्षांच्या अवधींत प्राचीन ज्ञानभांडाराचें त्यानें खूपच आलोडन केलें होतें. या मध्यंतरींच्या काळांत डेकार्ट हा प्रसिद्ध तत्त्वज्ञ पुढें आला होता. त्याचा पंथ वाढत होता. त्याची विचारसरणी 'कार्टेजियानिझम्' या नांवानें ओळखली जाते. डेकार्ट हा अर्वाचीन तत्त्वज्ञानपद्धतीचा जनक समजला जातो. व्हिको या नव्या प्रवाहाशीं अपरिचित होता. त्यामुळें कांहीं काळपर्यंत त्याला मागें रहावें लागलें. पुढें १६९७ मध्यें विद्यापीठांत साहित्यशास्त्राचा प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली. या जागेचें वेतन बेताचेंच होतें. त्याच्या वाढत्या संसाराची तोंडमिळवणी कशीबशी या वेतनांत त्याला करावी लागत असे. बिकट आर्थिक परिस्थितीला न जुमानतां त्यानें व्यासंग, चिंतन आणि मनन हीं अखंड चालू ठेविलीं होतीं. यावेळीं फ्रॅन्सिस बेकन आणि ग्रोटियस या दोन विचारवंतांचा त्याच्या मनावर गाढ परिणाम झाला. या दोघांच्याहि विचारसरणीचा ठसा त्याच्या ग्रंथांतून उमटला आहे. बेकनपासून इतिहास आणि तत्त्वज्ञान यांचें संशोधन करण्याची स्फूर्ति त्याला मिळाली. ग्रोटियसपासून कायदेशास्त्राच्या अभ्यासांत त्याला मार्गदर्शन लाभलें. दीर्घकाळपर्यंत संशोधक दृष्टीनें तो कायदेशास्त्राचा अभ्यास करीत होता. १७०८ पासून १७२१ पर्यंत कायदेशास्त्रावर त्यानें चार जाडे ग्रंथ लिहिले. या ग्रंथाच्या आधारावर विद्यापीठांतील कायदेशास्त्राच्या प्राध्यासनाच्या जागेच्या

निवडणुकीकरतां उमेदवार म्हणून तो उभा राहिला. पण वजन आणि वशिला यांच्या अभावीं त्याची निवड होऊं शकली नाहीं. तरीहि निराश न होतां तो पुनः आपल्या आवडत्या व्यासंगाला लागला. त्यानें इतिहासशास्त्राचा विषय हातीं घेतला आणि दीर्घ परिश्रमानंतर १७२५ मध्यें 'साएन्झा न्युओव्हा (Scienza Nuova)'-'नवविज्ञान'-हा इतिहासशास्त्रावरचा क्रांतिकारक ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाचा साविस्तर मथळा असा होता—"राष्ट्रांचें स्वरूप दिग्दर्शित करणाऱ्या नव्या शास्त्राचीं मूलतत्त्वें आणि लोकसमूहासंबंधींच्या निसर्गनियमांचीं तदुद्भूत नवतत्त्वें" (Principles of a new science dealing with the nature of Nations, through which are shown also New Principles of the Natural Laws of Peoples). या ग्रंथांत त्यानें इतिहासाकडे पाहाण्याचा नवा दृष्टिकोण मांडला. या ग्रंथामुळेंच तो प्रसिद्धीस आला आणि त्याचें नांव इतिहासांत राहिलें आहे.

कायदेशास्त्राचा अभ्यास चालू असतां व्हिको कायद्याचा उगम आणि इतिहास यांकडे वळला. कायद्याच्या इतिहासांतून त्यानें जगाच्या इतिहासांत प्रवेश केला. इतिहासशास्त्राविषयींचें त्याचें मनन आणि संशोधन कित्येक वर्षें चालू होतें. त्यांतूनच त्याचा इतिहासवाद उत्पन्न झाला. १७२५ सालीं प्रसिद्ध झालेल्या ग्रंथानें त्याचें समाधान झालें नाहीं. म्हणून त्यांत सुधारणा करून त्याची वाढविलेली दुसरी आवृत्ति १७३० सालीं त्यानें प्रसिद्ध केली. शैली आणि अंतरंग या दोन्ही दृष्टींनीं हा ग्रंथ पहिल्याहून अगदीं वेगळा होता. या दुसऱ्या आवृत्तीनें त्याच्या लौकिकांत भर पडली आणि नेपल्सचा राजा तिसरा चार्ल्स यानें इतिहासतज्ज्ञ म्हणून त्याची आपल्या दरबारीं नेमणूक केली.

पण आतां त्याचा वृद्धापकाळ झाला होता. सारें आयुष्य दारिद्र्याशीं झगडण्यांत गेलेलें. मोठ्या कुटुंबाचा भार त्याच्यावरच पडला होता. त्याच्या योग्यतेच्या मानानें जन्मभर उपेक्षाच पदरीं पडलेली. त्यामुळें त्याचें शरीर आणि त्याबरोबर मनहि थकलें होतें. मधून मधून त्याला बुद्धिभ्रंशाचें झटकेहि येत असत. पण आपला इतिहाससंशोधनाचा नाद त्यानें अखेरपर्यंत सोडला नाहीं. ज्या ज्या वेळीं त्याची मनःस्थिति ठिकाणावर असे, त्यावेळीं 'साएन्झा न्युओव्हा' मध्यें सुधारणा करून तो भर घालीत असे. अशा रीतीनें सुधारलेली तिसरी आवृत्ति १७४४ मध्यें प्रकाशित झाली. या आवृत्तीचें चीज कसें काय झालें हे पाहण्याला तो जिवंत राहिला नाहीं. कारण २० जानेवारी १७४४ रोजीं तो मृत्यु पावला. मृत्यूनंतरहि दुर्दैवानें त्याची पाठ सोडली नाहीं असें दिसतें! त्याच्या शवाचा अंत्यविधि कोणी करावयाचा याबद्दल वांधा निघाला! तो ज्या चर्चचा अनुयायी होता त्याचे अधिकारी आणि त्याच्या विद्यापीठाची प्राध्यापक मंडळी, दोघेहि त्याच्या शवावर आपला हक्क सांगूं लागले. अखेरीस समेट होऊन दोघांनींहि मिळून गेरोलिनीच्या चर्चमध्यें त्याचे अंत्य संस्कार पार पाडले.

## व्हिकोपूर्वींचे इतिहासलेखक

व्हिको हा अर्वाचीन इतिहासशास्त्राचा जनक आहे. निसर्ग आणि त्याचे गुणधर्म यांचें शास्त्र आहे. पण मानवी इतिहासाचें शास्त्र कां नाहीं, असा प्रश्न उभा करणारा पहिला विचारवंत व्हिको हाच होय. केवळ असा प्रश्न उभा करूनच तो थांबला नाहीं, तर शास्त्र या दृष्टीनें इतिहासाचें तत्त्वज्ञान त्यानेंच प्रथम मांडलें. सृष्टिशास्त्राच्या मागें सारेच जण लागले आहेत; पण माणसाच्या गतकालीन इतिहासाकडे कोणीच लक्ष देत नाहींत, अशी त्याची तक्रार होती. ही तक्रार दूर करण्याच्या मार्गाला तो लागला. व्हिकोनें मांडलेल्या इतिहासवादाचें महत्त्व समजण्याकरितां त्याच्यापूर्वीं इतिहासलेखनाचे जे प्रयत्न झाले त्याचें धांवतें समालोचन करणें अवश्य आहे.

प्राचीन काळापासून इतिहास या ना त्या स्वरूपांत लिहिण्यांत येत होते. पण त्यांना शास्त्राचा दर्जा प्राप्त झाला नव्हता. शास्त्र या दृष्टीनें इतिहासाकडे पाहण्याची दृष्टि १९ व्या शतकांत रूढ झाली असली, तरी इतिहासलेखनाचा खरा प्रारंभ प्राचीन काळीं आयोनिअन नगरांतील ग्रीक पंडितांनीं केला. हिरोडोटस (खि. पू. ४८४–४२५) हा इतिहासलेखनाचा आद्यप्रवर्तक मानला जातो. त्याच्या इतिहासाचें स्वरूप संकलनात्मक होतें. त्याचा दृष्टिकोन

व्यापक होता. त्याच्या काळीं उपलब्ध असलेली सारी माहिती त्यानें व्यवस्थितपणें एकत्र मांडली. त्याच्याहीपेक्षां नीटपणें आणि शास्त्रशुद्ध इतिहास लिहिण्याचें श्रेय थुसिडायडिस (खि.पू. ४७१–४०१) आणि पॉलिबस ( खि. पू. २०४–१२२ ) या ग्रीक विद्वानांकडे जातें. थुसिडायडिसचें इतिहास-लेखन कलात्मक आणि ओजस्वी असून सत्यकथनावर त्याचा भर होता. सत्य बाजूला सारणाऱ्या खुषमस्कऱ्या कथाकारांचा त्यानें स्पष्ट शब्दांत निषेध केला आहे. खिस्तपूर्व पहिल्या शतकांत होऊन गेलेल्या डायोनिसियस या पंडितानें 'इतिहास हें तत्त्वज्ञानाचें प्रात्यक्षिक आहे' ( History is philosophy teaching by examples ) हें तत्त्व मांडून इतिहासलेखनाला निश्चित अर्थ प्राप्त करून दिला. तत्पूर्वी ॲरिस्टॉटलनें इतिहासाची एकसंध आणि विकासात्मक कल्पना गृहीत धरली होती. त्याच्या मतें इतिहास ही पद्धतशीरपणें विकास पावत जाणारी प्रक्रिया आहे. रोमन लोकांनीं इतिहास लिहिले; पण ग्रीकांचा दर्जा त्यांना गांठतां आला नाहीं. सॅलुस्ट (खि. पू. ८६–३४) हा पहिला रोमन इतिहासकार थुसिडायडिसचाच अभ्यासक होता. सर्व रोमन इतिहासकारांत लिव्हि ( खि. पू. ५९–ते खिस्तोत्तर १७ ) हा लोकप्रिय होऊन गेला. त्याच्या इतिहासांत लालित्य आणि कला अधिक आहेत. त्याच्यानंतर सुमारें एका शतकानें टॅसिटस हा श्रेष्ठ इतिहासलेखक झाला. त्याच्या इतिहासांत नीति-तत्त्वावर अधिक भर होता. त्याच्या पश्चात् रोममधील इतिहासलेखनाचा ऱ्हास झाला.

यानंतर इतिहासरचनेचा मक्ता खिस्ती धर्माधिकाऱ्यांच्या हातीं गेला. त्यामुळें इतिहासाचा उपयोग धर्मकारणीं होऊं लागला. धर्मप्रसाराचें तें एक साधन झालें. थोडक्यांत म्हणजे इतिहास-लेखन धर्माची बटीक होऊन राहिलें. खिस्ती इतिहासकारांनीं इतिहासाच्या मुळाशीं दैवी संकेत असतो असें सांगून त्या संकेताचें प्रतिफल म्हणजे खिस्तावतार हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या मतें मानवेतिहासाची परिणति शेवटच्या निर्णयाच्या दिवसांत व्हावयाची होती. सेंट ऑगास्टिन हा खिस्त्यांचा प्रमाणभूत इतिहासकार होता. त्याची इतिहासममिांसा 'देवनगरी' या त्याच्या ग्रंथांत आहे. त्याच्या मिमांसेंत ईश्वर आणि सैतान यांच्या झगड्यांत माणसें हीं केवळ दैवाच्या हातचीं दुबळीं बाहुलीं बनलीं आहेत. ऑगास्टिनच्या विचार-सरणीचा पगडा साऱ्या युरोपभर एक हजार वर्षेपर्यंत बसला होता. पुनरुज्जीवनाच्या–रेनासान्सच्या चळवळीनेंच त्यांतून युरोपीय मानवाची सुटका केली.

## सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची नवी दृष्टि

मध्ययुगांत इतिहास हें लोकांना जणूं झुलविण्याचें साधन झालें होतें. पुरोहित राजेरजवाडे आणि सेनापति हेच इतिहासांतील मुख्य सूत्रधार समजले जात असत. इतिहासाला या गर्तेतून काढण्याचें पहिलें श्रेय अरब पंडितांना दिलें पाहिजे. अरबांजवळ इतिहासलेखनाची शास्त्रीय दृष्टि होती. अरब पंडितांना स्फूर्ति मिळाली ती ग्रीक तत्त्ववेत्त्यांपासून–विशेषतः ॲरिस्टॉटलपासून. १० व्या शतकापासून इतिहासाला शास्त्रशुद्ध स्वरूप देण्याचे प्रयत्न अरबांनीं केले. अरब संस्कृतीनें अनेक थोर दर्जाचे इतिहास-कार निर्माण केले. त्यांत १४ व्या शतकांत होऊन गेलेला इब्न खाल्डून (इ. स. १३३२–१४०६) हा सर्वांत श्रेष्ठ गणला जातो. त्यानें लिहिलेल्या 'विश्वेतिहास' ( Universal History ) हा जगांतील थोर ग्रंथांपैकीं एक समजला जातो. त्याचा हा ग्रंथ म्हणजे विद्वत्ता आणि ज्ञान यांचें भांडार आहे. चिकित्सक बुद्धि, विशुद्ध दृष्टिकोन आणि गाढ तत्त्वज्ञान यामुळें हा ग्रंथ अद्वितीय ठरला आहे. प्रो. फ्लिंट हा तर इब्न खाल्डूनला 'इतिहासशास्त्राचा जनक' अशी पदवी देतो.

अरब संस्कृतीचें लोण इटली आणि स्पेन देशांतील विद्यापीठांच्या द्वारें युरोपखंडांत पोहोंचलें. त्यामुळें प्राचीन लोकांच्या भौतिक आणि चिकित्सक तत्त्वज्ञानाचें भांडार युरोपीयांना खुलें झालें. यांतूनच 'रेनासान्स'च्या चळवळीची लाट साऱ्या युरोपभर उसळली. या चळवळींतून मानवतावादाचा उदय झाला. मानवतावादानें चर्चविरुद्ध बंड पुकारून मानवाच्या कर्तृत्वावर भर दिला. रेनासान्सचा मानव या वादानें भारून गेला होता. नव्या दृष्टीनें तो जगाकडे पाहूं लागला. धर्माच्या दास्यांतून सुटका करून घेण्याकरितां तो धडपडूं लागला. धर्म आणि

ईश्वर यांच्या निरपेक्ष इतिहासाची चिकित्सा सुरू झाली. रेनासान्सचे प्रारंभीचे लेखक ग्रीकांच्या वाङ्मयाला आणि साहित्यकलेला फार महत्त्व देत असत. इतिहासाला गौणत्व होतें. रेनासान्सच्या काळापासून व्हिकोपर्यंत अनेक इतिहासलेखक होऊन गेले. रेनासान्सच्या इतिहासकारांनीं सेंट ऑगास्टिनच्या इतिहासममिांसेला आव्हान द्यायला सुरुवात केली. हे नवे इतिहासकार आणि चर्चचे इतिहासकार यांच्यांत कित्येक वर्षे फार मोठें द्वंद्व माजून राहिलें होतें. त्याचा फायदा असा झाला कीं नवनवी ऐतिहासिक माहिती उजेडांत येऊं लागली आणि तिचें संकलन होऊं लागलें. पण मानवेतिहासाचे सम्यक् समालोचन करून त्यांतलि मूलभूत नियमांची समाधानकारक उपपत्ति मांडण्यास अद्याप कोणी पुढें आला नव्हता. इतिहासांतील अंतर्गत प्रवाहांचा उलगडा करण्याचे प्रयत्नही झाले नाहींत. त्यामुळें इतिहासलेखन खूप होऊन-सुद्धां इतिहासाचें तत्त्वज्ञान १८ व्या शतकापर्यंत अवतीर्ण होऊं शकलें नाहीं.

## व्हिकोच्या विश्वाचे दोन ध्रुव

इतिहासाला शास्त्राच्या पातळीवर आणण्याचा पहिला प्रयत्न व्हिकोनेंच केला. सृष्टिशास्त्रांत जसे विश्वनियम असतात तसेच ते मानवेतिहासांतही असतात आणि त्यांच्या मुळाशीं विशिष्ट तत्त्वज्ञान असतें हें त्यानेंच प्रथम स्पष्टपणें मांडलें. फ्रॅन्सिस बेकन आणि ग्रोटिअस ह्यांच्यापासून त्याला स्फूर्ति मिळाली होती. बेकनच्या निगमनात्मक पद्धती-(Inductive Method)मुळें सृष्टिशास्त्र आणि एकंदर विज्ञान यांची वाढ होण्याला मदत झाली होती. हीच पद्धति व्हिकोनें मानवेतिहासाला लावून पाहिली. ग्रोटिअस हा नेदर्लंडमधला पंडित मानवतावादी परंपरेंत वाढला होता. राज्यशास्त्राचे सामान्य नियम शोधून काढण्याकरितां धर्म आणि तत्त्वज्ञान यांचें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें त्यानें परिशीलन केलें होतें. त्याचे प्रयत्न व्हिकोच्या डोळ्यासमोर होते. या पूर्वसूरींचें अनुकरण करून त्यानें मानवी समाजाच्या इतिहासाला त्यांच्या पद्धतींच्या कसोट्या लावल्या.

त्या काळीं नेपल्स हें कायदेशास्त्राचें मोठें विद्यापीठ म्हणून नाणावलें होतें. तेथें अनेक नामांकित कायदेपंडित होऊन गेले. नेपल्स येथें असतांना व्हिकोनें रोमन कायद्याचा आणि त्याच्या इतिहासाचा खोल अभ्यास केला. निरनिराळ्या देशांत वेगवेगळ्या काळीं कायद्यांत जे बदल होतात, त्यांच्या कारणांचा तो तलास लावूं लागला. त्या वेळीं त्याला दिसून आलें कीं निरनिराळ्या कायद्यांत जी भिन्नता आणि फेरबदल आढळतात ते त्या त्या देशाच्या इतिहासामुळें घडून येतात. मानवी सुधारणेबरोबर कायद्यांतहि प्रगति होत जाते. ही प्रगति मानवाची जी मानसिक प्रगति होत असते तिच्यामुळें होते असें त्याला आढळून आलें. म्हणून त्यानें असा शोध लावला कीं कायद्याचा उगम हा मानवी मनांतूनच होतो. कायद्यांत जे ऐतिहासिक बदल होतात ते माणसाच्या मानसिक अवस्थेंत जीं स्थित्यंतरें होतात त्यामुळें होतात असें सांगून व्हिकोनें कायदा आणि मानवी मन यांचा परस्परसंबंध दिग्दर्शित केला.

हा संबंध जसा कायद्याच्या इतिहासाला लागू पडतो, तसाच तो मानवेतिहासालाहि लागू पडतो. म्हणून व्हिको माणसाच्या अंतर्विश्वांत शिरला. सृष्टिशास्त्राची वाढ होण्याचें कारण बाह्यविश्वाचें निरीक्षण करणें सहजसाध्य आणि सोपें असतें हें होय; पण मानवाच्या मनांत प्रवेश करून त्याची चिकित्सा करणें अधिक कठिण आहे म्हणून त्याकडे दुर्लक्ष होत आलें असें सांगून इतिहासाचें संशोधन करण्याकरितां त्यानें अंतर्मनांत अवगाहन करण्याचा उपक्रम सुरू केला. मानवी समाज एका प्रदीर्घ प्रक्रियेंतून उत्क्रांत होत आला असून निरनिराळ्या अवस्थांतून जात जात तो सुधारत आणि सुसंस्कृत होत आला आहे हें रोमन कायद्याच्या इतिहासानें त्याच्या बुद्धीला पटलें होतें. या उत्क्रांतिक्रमाचा मागोवा घेत घेत व्हिको मानवाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेपर्यंत पोहोंचला. प्राथमिक अवस्थेंतील मानव हा सुधारलेल्या अवस्थेंतील मानवासारखाच असतो असें मानण्याची त्याच्या काळांतील विचारवंतांची चूक त्यानें दाखवून दिली. त्यानें असें सांगितलें कीं, मानवी समाजाच्या बाल्यावस्थेचा विचार करावयाचा म्हणजे त्या काळांतील मानवाची मानसिक अवस्था—मान-

सिक पातळी प्रथम समजून घेतली पाहिजे. प्राथमिक मानव आणि लहान बालक यांच्या मानसिक अवस्थेंत साम्य असतें. या मानवाचें ज्ञान रांगडें असतें, कल्पनाविलास दांडगा असतो, गहन तात्त्विक विचार करण्याची ताकद आलेली नसते, चमत्कार आणि भ्रांति यावर अधिक विश्वास असतो. त्याच्या विचारांना मूर्त स्वरूप येण्याकरितां ते साकार आणि दृश्यमान स्वरूपांत मांडावे लागतात. साऱ्या निसर्गशक्तींचें आणि मानसिक कल्पनांचें तो मानुषीकरण करतो. म्हणून या अवस्थेंत पौराणिक कथांचा जन्म होतो. अशी दृष्टि ठेवून इतिहासाचें समीक्षण केलें पाहिजे असें व्हिकोनें प्रतिपादन केलें. इतिहास आणि मानवशास्त्र हे व्हिकोच्या विश्वाचे दोन ध्रुव होते. माणसाच्या मानसिक शक्तीवर त्यानें भर दिल्यामुळें त्याच्या पद्धतींत साहजिकच मानवाला आणि त्याच्या कर्तृत्वाला महत्त्व प्राप्त झालें. मानवी समाजाच्या साऱ्या इतिहासाचें आलोडन केल्यानंतर इतिहास हा मानवकर्तृत्वाचा आविष्कार आहे हें त्याला पटून आलें. तो म्हणतो कीं, 'इतिहासाच्या अभ्यासानें ज्या एका महान् सत्याचा साक्षात्कार सतत होत असतो तें हें कीं, सारा इतिहास हा मानवानेंच घडविला आहे आणि म्हणून त्याचा उलगडा त्याच्या मनांतच शोधला पाहिजे.' व्हिकोच्या इतिहासवादाचें रहस्य या तत्त्वांतच सांठलें आहे.

### मानवेतिहासाचा चक्राकार विकास

या तत्त्वाच्या आधारानें व्हिकोनें मानवेतिहासाच्या निरनिराळ्या कालखंडांची ऐतिहासिक संगति लावून दाखविली. प्राथमिक अवस्थेंतील मानवसमाजाचा धर्म हा जसा कल्पितकथां-(Myths)नीं युक्त असतो, तसाच त्याचा इतिहाससुद्धां कल्पित कथांचा असतो. या अवस्थेंत माणसाची विचारशक्ति अशा कथांच्या द्वारेंच काम करूं शकते. म्हणून त्याच्या इतिहासाला पुराण वाङ्मयाचें स्वरूप असतें–पुराणें आणि इतिहास एकरूप असतात. ही उपपत्ति व्हिकोनें ग्रीस आणि रोम यांच्या प्राचीन इतिहासाला लावली. 'साएन्झा न्युओव्हा'चा एक भाग त्यानें 'खऱ्या होमरचा शोध' करण्यांत खर्ची घातला आहे. ग्रीसमधील साऱ्याच नगरी होमरची जन्मभूमि असल्याचा दावा सांगतात. याचें कारण व्हिकोनें असें सांगितलें कीं, इलियड आणि ओडेसी हीं काव्यें एकाच कवीचीं नसून निरनिराळ्या नगरांत राहाणाऱ्या अनेक लोककवींच्या काव्याचीं तीं एकत्र केलेलीं संकलनें आहेत. या अर्थानें साऱ्या ग्रीक लोकांचीं तीं लोककाव्यें होतीं. होमर आंधळा होता असें मानण्याचें कारण असें कीं, त्या काळांतील मानव अज्ञ आणि अप्रज्ञावान् असतात; त्याचें प्रतीक म्हणजे आंधळा होमर होय. व्हिकोच्या काळांत ही उपपत्ति अगदीं अभिनव होती यांत शंका नाहीं.

ग्रीस आणि रोम या देशांच्या इतिहासाचा बारकाईनें अभ्यास करून व्हिकोनें आपले बहुतेक इतिहासविषयक सिद्धान्त मांडले आहेत. त्या इतिहासावरूनच त्यानें मानवसमाजाच्या उत्क्रमणाच्या निरनिराळ्या अवस्था दिग्दर्शित केल्या. रानटी अवस्थेंतून स्वतःच्या कर्तृत्वानें माणूस आपली सुधारणा करून प्रगत होत आला आहे. रानटी अवस्थेंत निसर्गशक्तींच्या भीतींतून धर्माचा उगम झाला; विवाहसंस्थेचा उदय होऊन कुटुंबसंस्था तयार झाली; प्रेतसंस्कारांतून पूर्वजपूजा निर्माण झाली. अशा विविध संस्कारांतून आणि संस्थांतून मानवसमाज पायरीपायरीनें सुधारत आणि सुसंस्कृत होत आला. व्हिकोनें या उत्क्रमणाच्या तीन अवस्था कल्पिल्या. दैवी (Divine), विभूति (Heroic) आणि मानवी (Human) अशीं या अवस्थांना त्यानें नांवें दिलीं. प्रत्येक अवस्थेंत तिला अनुरूप असें राज्ययंत्र, भाषा, वाङ्मय, कायदा संस्कृति हीं तयार होत असतात. अवस्था बदलली कीं यांतहि बदल होतो. पहिल्या अवस्थेंतील राज्ययंत्र हें सरदारशाहीचें (Aristocratic) असतें. सत्ताधारी वर्गाच्या जुलुमांनीं त्रस्त झालेले सामान्य जन त्याविरुद्ध बंड करतात आणि मग लोकसत्ताक राज्याची प्रस्थापना होते. कालांतरानें लोकसत्तेचाहि अतिरेक होतो आणि तिच्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू होते. या प्रतिक्रियेंतून साम्राज्यें जन्माला येतात. हीं साम्राज्येंहि पुढें अधोगतीला जाऊन ऱ्हास पावतात आणि मानवी समाज पुन्हा रानटी अवस्थेप्रत जातो. या रानटी अवस्थेंतून तो पुनः बाहेर पडतो आणि वर

सांगितलेल्या अवस्थांमधून त्याचें भ्रमण पुनः सुरू होतें. मानवी भ्रमणाच्या या चक्री-क्रमाला व्हिकोनें 'वर्तुल-सिद्धान्त' (Law of cycles) असें नांव दिलें आहे. सारीं राष्ट्रें याच वर्तुळांतून फिरतात. व्हिकोच्या मतें हाच 'आदर्श शाश्वत इतिहास' होय आणि सर्व देशांना कमी-अधिक प्रमाणांत तो लागू होतोच होतो. देशोदेशींचे इतिहास वेगळे आणि स्वतंत्र असले तरी मानवी स्वभाव हा मुळांत सगळीकडे सारखाच असल्यामुळें हा इतिहासक्रम सर्वत्र लागू पडतो असें त्याचें म्हणणें होतें. व्हिकोनें आपला सिद्धान्त मुख्यतः रोमच्या इतिहासावरच आधारला होता. या सिद्धांतांत त्यानें मानवसमाजाचा विकास-क्रम स्पष्ट केला नाहीं. तो त्याला मान्य होता यांत शंका नाहीं. पुढें मार्क्सनें विकासक्रमाची कल्पना आपल्या इतिहासवादांत विशद केली. मानवेतिहा-साचा चक्राकार विकास त्यानें मान्य केला आणि हा विकास वर्तुळाच्या आवर्तनानें (Spiral) होतो असें त्यानें सांगितलें. मानवी इतिहासाचें वर्तुळ हें ऊर्ध्वगामी असतें. ज्या बिंदूपासून तें निघतें त्या बिंदूकडेच तें फिरत फिरत न येतां वरच्या पातळी-वर जातें आणि तेथून पुनः फिरूं लागतें. इतिहासा-चा क्रम मार्क्सवादाप्रमाणें ऊर्ध्वगामी आणि सतत विकासशील असा आहे. व्हिकोच्या इतिहासवादां-तील मूळ कल्पना मार्क्सच्या इतिहासवादांत अशा रीतीनें विस्तार पावली आहे.

## मानवेतिहास व भाषेतिहास यांचा संबंध

व्हिकोनें इतिहासाचे दोन भाग पाडले. एक भाषेचा इतिहास आणि दुसरा मानवी घडामोडींचा इतिहास. इतिहासांत भाषाशास्त्राला त्यानें फार महत्त्व दिलें हा त्याचा विशेष होता. त्याच्या मतें भाषाशास्त्र हा इतिहासाचाच एक भाग आहे. इतिहासशास्त्रांत भाषेच्या इतिहासाला विशिष्ट महत्त्व आहे. भाषेचा उगम हा मानवाच्या अगदीं प्रथमा-वस्थेंत होतो. त्याच्या प्रगतीबरोबर भाषेचीहि प्रगति होत जाते. प्राथमिक मानव आपल्या भावना आणि विचार प्रकट करण्याकरितां शब्द निर्माण करतो. त्याच्या भावना, विचार, मन हीं जशीं प्रगल्भ होत जातात, तशी भाषाही प्रगल्भ होत जाते. म्हणून भाषेच्या इतिहासांत मानवाच्या विचारांचा इतिहास अंतर्भूत असतो. विचारांचा—तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि भाषेतिहास हे एकरूप असतात. प्राचीन इतिहासाचें संशोधन भाषाशास्त्रा-मुळेंच मुख्यतः शक्य झालें आहे. मानवेतिहास आणि भाषेतिहास यांच्या संबंधाचा दुवा व्हिकोनें स्पष्टपणें दाखवून दिला. हीच कल्पना पुढें हेगेलनें निराळ्या शब्दांत विशद केली. हेगेल म्हणतो कीं तत्त्वज्ञानाचा इतिहास हाच जगाचा इतिहास होय.

## मानवी कर्तृत्वालाच अंतिम श्रेय

मानव हाच आपल्या इतिहासाचा निर्माता असतो. मानवेतिहासामागची खरी शक्ति म्हणजे स्वतः मानव हीच असते, हा महान् सिद्धान्त व्हिकोनेंच प्रथम मांडला, हें त्याला सर्वांत मोठें श्रेय होय. 'रेनासान्स'च्या मानवतावादी चळवळीचा हा परिणाम होता. वास्तविक व्हिको हा रेनासान्सच्या विरोधी पक्षांतला म्हणजे धर्मसुधारक पंथांतला होता. तो रोमन कॅथोलिक असून धर्मनिष्ठ होता. विश्वाचा नियंता ईश्वरच आहे यावर त्याची दृढ श्रद्धा होती. पण त्याचा ईश्वर स्वेच्छेनें राज्य करणारा नव्हता. तो निसर्गनियमांना अनुसरून विश्वाचें नियंत्रण करतो असें तो मानीत असे. विश्वाचें नियं-त्रण विशिष्ट विश्वनियमांनीं चाललें आहे हें तत्त्व त्याच्या एकंदर विचारसरणीचा पाया होता. त्यामुळें ईश्वरनिष्ठ असून सुद्धां मानवी कर्तृत्वाला इतिहासांत तो प्राधान्य देऊं शकला. सृष्टींतील घडामोडींच्या अभ्या-सानें ज्याप्रमाणें शास्त्रज्ञ निसर्गनियम शोधून काढतात, त्याप्रमाणेंच इतिहासाचे नियम शोधून काढण्याकरितां मानवी घडामोडी आणि मानवी मन यांचें संशोधन करणें हें तत्त्ववेत्त्यांचें काम आहे असें तो म्हणत असे. ही दृष्टि ठेवूनच त्यानें मानववंशशास्त्र, भाषाशास्त्र आणि समाजशास्त्र यांच्या आधारानें आपला इतिहासवाद रचला. ईश्वर मानून सुद्धां त्यानें त्याला निसर्गनियमांनीं बांधलें आणि अखेरचें श्रेय मान-वाला दिलें यांतच त्याच्या विचारसरणीचें वैशिष्ट्य आहे. दैवी अवस्थेंतून मानवी अवस्थेंत मानवाचें उत्क्रमण होतें हा सिद्धान्त आपल्या सर्व ग्रंथांत त्यानें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. मानवी अवस्था ही सर्वांत प्रगत आणि प्रगल्भ अवस्था, असें तो मानतो. मानवी उत्क्रमणाच्या मुळाशीं प्रश्नेची

प्रेरणा असते हें त्यानें गृहीत धरलें. अलौकिक प्रज्ञा (Poetic Wisdom) आणि गूढ प्रज्ञा ( Occult Wisdom ) असे प्रज्ञेचे दोन प्रकार त्यानें कल्पिले. मानवेतिहास ज्यावेळीं दैवी अवस्थेंतून मानवी अवस्थेंत उत्क्रांत होतो त्या वेळीं प्रज्ञा अलौकिक अवस्थेंतून गूढावस्थेंत परिणत होते. प्रज्ञेच्या या रूपांतराचा इतिहास म्हणजे मानवेतिहास होय अशी त्याची कल्पना होती. त्यानें मानलेली गूढ प्रज्ञा ही सामाजिक स्वरूपाची म्हणजे जिचा आविष्कार समाजाच्या द्वारें होतो अशी होती. मानवांतील विवेकशक्ति, त्यानें निर्माण केलेलें तत्त्वज्ञान आणि मानवी सुधारणा, यामुळें अलौकिक प्रज्ञेचें गूढ प्रज्ञेंत—सामाजिक प्रज्ञेंत रूपांतर होतें. व्हिकोच्या मतें हें इतिहासाचें सार होतें. व्हिकोचें हें प्रतिपादन तर्काच्या कसोटीला उतरणारें नव्हतें. त्याच्या ठिकाणीं इतिहास आणि अध्यात्म यांचा मिलाफ झाला होता. तरी पण दैवी प्रज्ञेचें रूपांतर मानवी प्रयत्न आणि सामर्थ्य यामुळेंच होतें असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्याच्या इतिहासवादांत अंतिम श्रेय मानवकर्तृत्वाकडेच येतें.

### व्हिकोच्या इतिहासवादाची छाप

व्हिकोचे ग्रंथ एक शतकपर्यंत अंधारांत धूळ खात पडले होते. त्यांना अज्ञातावस्थेंतून बाहेर काढण्याचें काम मिचेलेट या तरुण फ्रेंच इतिहासकारानें केलें. १८२७ मध्यें मिचेलेटनें व्हिकोच्या ग्रंथांचे अनुवाद प्रसिद्ध केले. मिचेलेटनें जगाचा इतिहास लिहिण्याचें कार्य हातीं घेतलें होतें. त्याच्या अकालीं मृत्यूमुळें तें त्याच्या हातून पुरें होऊं शकलें नाहीं. इतिहासाविषयीं ज्या रूढ कल्पना होत्या त्या मिचेलेटचें समाधान करूं शकल्या नाहींत. तो नव्या ऐतिहासिक दृष्टीच्या शोधांत होता. अशा वेळीं व्हिकोचे ग्रंथ त्याच्या आढळांत आले. व्हिकोच्या इतिहासवादानें तो अगदीं भारून गेला. त्याला हवें होतें तें त्यांत सापडलें. व्हिकोनें त्याला नवा प्रकाश आणि स्फूर्ति दिली. "मानवी जग हें मानवानेंच निर्माण केलें आहे आणि मानवनिर्मितीच्या या क्रियेमध्यें त्याची बुद्धि परिणत होत आली आहे" या सत्याचा साक्षात्कार मिचेलेटला व्हिकोपासूनच झाला असें त्यानें लिहून ठेवलें आहे. सर्व विज्ञान इथून तिथून एक आहे; भाषा, वाङ्मय, इतिहास, गणित, इतर भौतिक शास्त्रें हीं सर्व एकच आहेत; एकाच पद्धतीचीं हीं भिन्न अंगें आहेत आणि इतिहास आणि तत्त्वज्ञान हीं प्रारंभापासून एकरूप आहेत असा व्यापक स्वरूपाचा निष्कर्ष त्यानें व्हिकोच्या इतिहासवादापासून काढला. हा निष्कर्ष जगदितिहास लिहून विशद करून दाखविण्याला दुर्दैवानें तो जगला नाहीं.

व्हिकोचा परिणाम एकट्या मिचेलेटवरच झाला असें नाहीं. १९ व्या शतकांतील कित्येक थोर विचारवंतांवर व्हिकोच्या इतिहासवादाची छाप पडली होती. व्हिकोपासून मार्क्सपर्यंत इतिहासवादाची एक परंपराच निर्माण झाली होती असें म्हटलें तर चुकीचें होणार नाहीं. फ्रान्स आणि जर्मनी येथील लेखकांवर व्हिकोच्या 'नवविज्ञाना'चा परिणाम झाला होता यांत शंकाच नाहीं. १८ व्या शतकांतील फ्रान्समध्यें रूसोनें आपल्या बंडखोर विचारसरणीनें क्रांतिकारक विचार फैलावले होते. त्यानें व्हिकोचे ग्रंथ वाचले असले पाहिजेत. व्हिकोच्या 'नवविज्ञाना'ची तिसरी आवृत्ति व्हेनिसमध्यें ज्यावेळीं बाहेर पडली त्यावेळीं रूसो तेथेंच होता. भाषांच्या उगमावर रूसोनें जो प्रबंध लिहिला, त्यांत त्यानें मानवी समाजाच्या उगमाचा विचार करतांना भाषाशास्त्रावर अधिक भर दिला होता. हा व्हिकोच्या ग्रंथाचा परिणाम होय. फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळांत जर्मनींत इतिहासलेखकांची जी नवी पिढी पुढें येत होती तिच्यावर रूसोच्या विचारसरणीचा मोठा परिणाम झाला होता. त्यापैकीं हर्डर हा प्रमुख होता. हर्डर हा त्या काळचा एक बडा इतिहासकार असून 'मानवजातीच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानासंबंधीं विचार' (Ideas towards the Philosophy of History of Mankind) हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हर्डरनें व्हिकोचा ग्रंथ वाचला होता हें त्याच्या ग्रंथावरूनच दिसून येतें. हर्डरचा इतिहासवाद हा भौतिकवादी होता; पण त्यांत त्यानें भौगोलिक परिस्थितीवरच भर दिला होता. हर्डरप्रमाणेंच बुल्क, लेब्निझ, लेसिंग आणि गटे वगैरे जर्मन तत्त्ववेत्त्यांनींही व्हिकोच्या

ग्रंथांचें परिशीलन केलें होतें. इतकेंच नव्हें तर हेगेलच्या इतिहासवादावरसुद्धां व्हिकोची छाप पडलेली दिसून येते.

## व्हिको ते मार्क्स

हेगेलवर व्हिकोचा परिणाम झाला तो रूसोमुळें झाला असावा. हेगेल आणि व्हिको यांच्या इतिहासवादांत साम्य आहे. हें साम्य व्हिकोच्या 'विश्वकायदा' या ग्रंथाचें जर्मन भाषांतर १८५४ मध्यें प्रसिद्ध झालें, त्याच्या प्रस्तावनेंत भाषांतरकर्त्यानें विशद करून सांगितलें आहे. खुद्द हेगेलच्या 'इतिहासाचें तत्त्वज्ञान' या ग्रंथाला एडवर्ड गॅन्स याची जी प्रस्तावना आहे तीमध्यें व्हिकोचा उल्लेख असून त्यानेंच इतिहासवाद मांडण्याचा पहिला प्रयत्न केला असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून व्हिको ते हेगेल अशी संगति लावतां येते. हीच संगति पुढें मार्क्स–एंगल्सपर्यंत जाऊन भिडते. या दोघांनीहि मिचेलेटचे ग्रंथ वाचले होते इतकेंच नव्हें तर त्यांनीं खुद्द व्हिकोही वाचला होता. मानव स्वतःचा इतिहास घडवितो या सिद्धांतावर मार्क्सचा इतिहासवाद आधारला आहे. हा सिद्धांत त्यानें व्हिकोच्या ग्रंथांत वाचला होता. त्याच्या 'कॅपिटल' ग्रंथांतील एके ठिकाणीं तळटीपेंत (पान ३९२, 'एव्हरीमन्स लायब्ररी' प्रत) 'मानवेतिहास आणि सृष्टीचा इतिहास यांतील फरक म्हणजे मानवेतिहास हें मानवाचेंच कार्य आहे, पण सृष्टीचा इतिहास तसा नाहीं' असें व्हिकोनें म्हटल्याचें नमूद केलें आहे. व्हिकोनें उध्दृत केलेलें हें सूत्र हातीं घेऊन मार्क्सनें त्याचा शास्त्रशुद्ध विस्तार केला. मार्क्सनें ईश्वरी योजना अमान्य करून सर्वच भर मानवकर्तृत्वावर दिला. मार्क्सच्या इतिहासवादांतील व्हिकोचें ऋण मार्क्सवादांत अधिकारी गणलेल्या लेखकांनींहि मान्य केलें आहे. मार्क्सच्या इतिहासवादाची पद्धतशीर मांडणी करणारा लॅब्रिओला हा पहिला लेखक होय. त्यानें व्हिको हा इतिहासवादांत मार्क्सचा पूर्वाचार्य होता हें कबूल केलें आहे. पुढें पॉल लाफार्ग यानेंहि 'मार्क्सच्या इतिहासवादाचा मागोवा घेत घेत व्हिकोपर्यंत जावें लागतें आणि मॉर्गन हा या दोहोंमधला दुवा आहे' हें स्पष्टपणें दर्शविलें आहे.

## मार्क्सनें केलेला विकास

व्हिकोच्या कालपेक्षां मार्क्सच्या काळांत मानवी ज्ञानांत कितीतरी भर पडली होती, सर्व शास्त्रांत अनेक नवनवे शोध लागले होते. त्या सर्वांचा उपयोग करून मार्क्सनें व्हिकोच्या इतिहासवादाचा व्यवस्थित स्वरूपांत विकास केला. मानवी समाजाच्या प्रगतीचे नियम त्याला अधिक निश्चित स्वरूपांत मांडता आले. व्हिकोच्या 'वर्तुल–सिद्धांता'चा विकास मार्क्सवादांत झाला हें वर सांगितलेंच आहे. त्या सिद्धांताला हेगेलचा विरोधविकासवाद जोडून मार्क्सनें आपली पद्धति उभी केली. मानवी सुधारणेबरोबर माणसाचें मत विकसित होत जातें, त्याचे विचार प्रगल्भ होत जातात हें सांगणारा व्हिको हा पहिला इतिहासकार होता. तसेंच मानवी समाजाच्या प्रत्येक अवस्थेंत तिच्या अनुषंगानें समाजसंस्था–संस्कृतिमंदिर म्हणा हवें तर–भिन्न स्वरूपाच्या असतात हें व्हिकोनेंच सांगितलें होतें. व्हिकोच्या या सिद्धांताला मार्क्सनें उत्पादनसाधनांची धारणा दिली. उत्पादनसाधनांच्या पद्धतीप्रमाणें माणसाचे विचार तयार होतात, तिच्या पायावर समाजमंदिर उभें असतें असें मार्क्सचा इतिहासवाद सांगतो. व्हिकोची मूळ कल्पना मार्क्सनें साकार केली असें म्हणतां येईल. असें करतांना मार्क्सला उत्पादनसाधनें आणि त्यामुळें उत्पन्न होणारे समाजसंबंध यांचा भावार्थतींत ओतावा लागला. यांतहि मार्क्सवादानें अतिरेक केला. कारण मार्क्सच्या इतिहासवादांत ईश्वराला स्थान नाहीं; पण त्या ईश्वराची जागा उत्पादनसाधनांनीं घेतली आणि विचारांना गौणत्व आलें. त्यामुळें विचारांचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याची गरज आज विचारवंतांना भासूं लागली आहे. त्याकरितां व्हिको आणि हेगेल यांच्यापासून पुनः प्रारंभ करावा लागेल!

मार्क्सनें मानवेतिहासाचा निष्कर्ष वर्गविग्रह हा काढला. त्याच्या वर्गविग्रहाच्या सिद्धांताची पार्श्वभूमि व्हिकोच्या इतिहासवादांत सापडते. रोमच्या इतिहासांत पॅट्रिशियन आणि प्लेबियन (वरिष्ठ आणि कनिष्ठ) यांच्या झगड्यांतून लोकसत्ता प्रस्थापित झाली अशी उपपत्ति व्हिकोनें सांगितली. म्हणजे

इतिहासाच्या विग्रहात्मक कल्पनेचें मूळ व्हिकोच्या या उपपत्तींत सांपडतें. मिचेलेटनें हीच कल्पना स्पष्ट केली. तो म्हणतोः "जगाच्या प्रारंभाबरोबरच विग्रहाला सुरुवात झाली असून जगाच्या अंताबरोबरच तो थांबणार आहे. मानव विरुद्ध निसर्ग, चेतन विरूद्ध जड, स्वातंत्र्य विरुद्ध दैववाद असा हा विग्रह सतत चालू आहे. कधींहि न संपणाऱ्या या विग्रहाचा आलेख म्हणजे इतिहास होय." मार्क्सनें हाच विग्रह आधारभूत धरला आणि त्याला वर्गविग्रहाचें स्वरूप दिलें.

यावरून दिसून येईल कीं मार्क्सच्या इतिहासवादाचा उगम व्हिकोच्या तत्त्वज्ञानांत सांपडतो आणि व्हिको ते मार्क्स अशी भौतिक इतिहासवादाची परंपरा दर्शवितां येते. मार्क्सचें तत्त्वज्ञान हें क्रांतीचें तत्त्वज्ञान होतें. म्हणून त्यानें तत्त्वज्ञानाला क्रांतिकारक अर्थ प्राप्त करून दिला. "आजपर्यंत तत्त्ववेत्ते विश्वांतील घडामोडींचें केवळ निरूपण करीत आले आहेत; पण खरा प्रश्न आहे तो जुनें जग बदलून नवें जग निर्माण करण्याचा आहे," असें मार्क्सनें घोषित केलें. व्हिकोच्या मानवकर्तृत्वाच्या मूळ सिद्धांताची ही परिणति होती. म्हणून व्हिको हा मार्क्सच्या इतिहासवादाचा आद्यजनक आहे, असें सार्थतेनें म्हणतां येतें.

———

## आमचें स्वातंत्र्य अबाधित आहे

थोड्याच महिन्यांच्या आंत हिंदुस्थान हा प्रजासत्ताक —अनिर्बंध ( sovereign ) स्वतंत्र प्रजासत्ताक होईल. म्हणजेच त्याला अंतर्गत तसेंच बाह्य असें सर्व प्रकारचें स्वातंत्र्य मिळेल. त्या स्वातंत्र्याला कोणत्याही तऱ्हेनें बंधन घातलें गेलें नाहीं किंवा तसें घालणेंही शक्यहि नाहीं.

कांहीं लोकांना वाटतें कीं, आम्ही कांहीं गुप्त बोलणींही केलीं आहेत, किंवा पाश्चात्य राष्ट्रसंघ, अट्लांटिक करार यासंबंधीं आम्ही खलबतें केलीं आहेत! पण मला हें निक्षून सांगायचें आहे कीं, आम्हीं बिलकुल तसें कांहींही केलें नाहीं. अशीं खाजगी, गुप्त बोलणीं कशीं होऊं शकतील? आम्ही हिंदुस्थानचे लोक असें वागत नाहीं. जें जें घडून आलें आहे तें अगदीं खुल्या सीध्या मार्गानें झालें आहे. जें झालें तें कोणाला पसंत असेल, कोणाला नसेल. परंतु डोळ्याआड कांहीं प्रकार झाला असावा ही भावना आपण मनांतून काढून टाका.

सत्तेचें राजकारण खेळणारे निरनिराळे राष्ट्रगट अस्तित्वांत येत आहेत. अशा कोणत्याही गटाशीं आम्हांस निगडित व्हायचें नाहीं असेंच आमचें परराष्ट्रीय धोरण आम्हीं आंखलें आहे. असें धोरण म्हणजे कांहीं नाकर्त्याचें ( negative ) तटस्थतेचें धोरण नव्हे. त्या धोरणामागें जागतिक प्रश्नांना तोंड देऊन शांतता निर्माण करण्याच्या कामीं उपयुक्त अशी एक विधायक दृष्टि आहे.

कॉमनवेल्थमधील प्रधान मंत्र्यांच्या सभेंत सर्व लोक मैत्रीच्या व सहकार्याच्या भावनेनें प्रेरित होते. तत्त्वाच्या मुद्द्यावर कोणीही पडतें घेतलें नाहीं. तरीसुद्धां कोणी कोणाला सांकडें घातलें नाहीं कीं कोणाचा उपमर्द केला नाहीं. गहन प्रश्न सोडवायची ही शक्य तों अहिंसात्मक पद्धति अवलंबिली गेली. मला वाटतें, गांधीजींना ही आमची रीत पसंत पडली असती. कारण विजयामुळें जशी मागून कटुता राहाते, तशी ती मागाहून या रीतीनें राहात नाहीं. ही गोष्ट कांहीं लहानसहान नव्हे. पराभवापेक्षांही विजयाच्या मागून किती भयंकर कटुता, द्वेष आणि वैफल्य इत्यादि भावना निर्माण होतात, याचा आपण कित्येक वेळां अनुभव घेतला आहे. कटुता निर्माण करून विशेष गोष्ट साधून घेण्यापेक्षां कटुता निर्माण होऊं न देतां स्वल्पही साध्य करून घेणें अधिक महत्त्वाचें आहे.

—**पं. जवाहरलाल नेहरू**, लंडन येथील इंडिया लीगसमोरील भाषणांतून (२।५।४९)

श्री. वा. मु. लिमये

# कॉमनवेल्थमध्यें प्रजासत्ताक हिंदचें स्थान

"Republics, in various forms are the general order of the day. When nations have broken with their past, and set out on new voyages over new seas, they naturally fly republican flags. But there is no universal logic of republicanism— just as there is no universal logic of monarchy."

—Sir Earnest Barker, 'British Constitutional Monarchy'

राजकीय संज्ञांचे बदलते अर्थ अभ्यासणें मोठें मनोरंजक असतें. जीवन गतिमान् आणि स्थित्यंतरशील असल्यानें राजकीय संज्ञांच्या मध्यें एकतर नवा आशय ओतला जातो किंवा राजकीय संस्थांच्या मध्यें परिस्थितिसापेक्ष बदल करून त्यांच्या स्वाभाविक विकासाला वाव करून दिला जात असतो. नुकताच एक मोठा महत्त्वाचा बदल कॉमनवेल्थच्या कल्पनेंत घडून आला आहे. तो फरक जितका महत्त्वाचा, मूलगामी व दूरपरिणामी आहे तितकाच तो स्वाभाविकही आहे हें इतिहासाच्या प्रवाहाकडे पाहतां आढळून आल्याशिवाय रहाणार नाहीं.

## नवीन प्रतीकात्मक कल्पनेची आवश्यकता

हिंदुस्थान, पाकिस्तान आणि सिलोन या राष्ट्रांना वसाहतींचें स्वराज्य मिळाल्यानंतर ज्याला 'ब्रिटिश कॉमनवेल्थ ऑफ नेशन्स' असें म्हणत असत त्याच्या रचनें (composition)त एक स्थित्यंतर घडून आलें. असें झाल्यानें कॉमनवेल्थच्या कल्पनें-(Concept)तही बदल घडण्याची शक्यताच नव्हे तर संभाव्यताही निर्माण झाली. सात राष्ट्रांच्या पंतप्रधानांनीं लंडनला जमून नुकताच जो एक सद्गृहस्थाचा करार (Gentlemen's Agreement) केला तें त्याचेंच दृश्य फल होय. हिंदुस्थान (पाकिस्तान धरून) व सीलोन या वसाहती नव्हत्याच. ब्रिटिशांनीं येथें सत्ता स्थापन केली ती वास्तव्यासाठीं नव्हे, तर आर्थिक पिळवणुकीनें होणाऱ्या लाभासाठीं. हिंदुस्थान (पाकिस्तान धरून) व सीलोन हीं अंकित राष्ट्रें होतीं. हिंदुस्थानचे व ब्रिटिशांचे संबंध सलोख्याचे नव्हते, हें उघडच आहे. हिंदुस्थानला कांहीं कारणामुळें स्वातंत्र्य द्यावें लागलें व तें स्वातंत्र्य मिळतांना हिंदुस्थानचे हिंदुस्थान व पाकिस्तान असे दोन विभाग झाले. सीलोननें स्वातंत्र्यासाठीं मोठी झुंज दिली नाहीं. तरीही हिंदी स्वातंत्र्य निश्चित झाल्यावर सीलोनहि स्वतंत्र होणेंच स्वाभाविक होतें व तसें स्वातंत्र्य त्याला मिळालें. हिंदुस्थान व पाकिस्तान यांना वसाहतीचें स्वराज्य ज्या भारतीय स्वातंत्र्याच्या कायद्यानें मिळालें (The Indian Independence Act), त्या कायद्यानें कॉमनवेल्थमध्यें राहावें कीं बाहेर जावें याचा निर्णय घेणें हिंदुस्थान व पाकिस्तान यांच्या मर्जीवरच सोंपविण्यांत आलें. हिंदुस्थानच्या घटनासमितीनें उद्दिष्टांचा ठराव करून हिंदुस्थान हें एक स्वतंत्र सार्वभौम प्रजासत्ताक (Sovereign Independent Republic) राहील असें जाहीर केलें. प्रजासत्ताक हिंदुस्थान कॉमनवेल्थमध्यें राहूं शकेल किंवा नाहीं याविषयीं मोठा वाद माजला. आतां हिंदुस्थाननें आपण प्रजासत्ताक राहून कॉमनवेल्थमध्यें रहावयास तयार असल्याचें स्पष्ट केलें आहे. हिंदुस्थानची ही आकांक्षा कॉमनवेल्थकल्पनेंत जरूर तो बदल केल्यानें सफल झाली असून आज कॉमनवेल्थमध्येंही शांति, स्वातंत्र्य व प्रगति (Peace, Liberty and Progress) या तीन तत्त्वांची साधना करणाऱ्या राष्ट्रांची संघटना बनली आहे. कॉमनवेल्थमधल्या राष्ट्रांना एकत्र ठेवणारी शक्ति 'राजमुकुटा'वरील निष्ठा ही असल्यानें

प्रजासत्ताक हिंदला कॉमनवेल्थमध्यें रहातां यावें म्हणून कॉमनवेल्थमधलि राष्ट्रांना एकत्र ठेवील अशी एक नवीन प्रतीकात्मक कल्पना तयार करावी लागली असून ब्रिटनच्या राजाला एक दुहेरी भूमिका ( Double Role ) पार पाडण्याचें काम पत्करावें लागणार आहे.

हिंदुस्थान प्रजासत्ताक बनल्यावर कॉमनवेल्थच्या प्रत्येक राष्ट्राचा स्वतंत्र रीत्या राजा असा जो त्याचा आजवर दर्जा होता तो हिंदुस्थानबाबत तरी संपुष्टांत येईल. राजा हा कॉमनवेल्थचा प्रमुख ( Head of the Commonwealth ) म्हणून राहणार असून त्याचा एक ऐक्याचें प्रतीक ( unifying symbol ) असा दर्जा राहणार आहे. कॉमनवेल्थचीं इतर घटक राष्ट्रें राजाशीं एकनिष्ठ राहाणार असल्यानें त्याच्यापुरती तरी कॉमनवेल्थच्या सदस्यत्वाविषयींची बैठक बदललेली नसल्याचें ( the basis of whose membership is not hereby changed ) करारांत नमूद करण्यांत आलें आहे. कॉमनवेल्थच्या सभासदत्वासंबंधींची हिंदुस्थानची बैठक भिन्न असली तरीहि हिंदुस्थान हा पूर्णांशानें व समान दर्जाचा घटक म्हणूनच रहाणार आहे. राजानिष्ठेचें बंधन नसल्यानें हिंदुस्थान हा अंतर्गतच काय पण परराष्ट्रिय बाबतींतही पूर्णपणें मुखत्यार राहणार आहे ही गोष्ट स्पष्ट होत आहे. आयर्लंडनें गव्हर्नर-जनरलची जागा रद्द करणें, राजानिष्ठेची शपथ गाळणें इत्यादि गोष्टी केल्या तरी राजाशीं नाममात्र दुवा ( nominal link ) कायम ठेवला व परराष्ट्रवकीलांच्या ओळखपत्रांवर (credentials) राजाची सही असावी एवढेंच बंधन लादून घेतलें. हिंदुस्थानचा राजाशीं कोणताच संबंध उरावयाचा नसून कॉमनवेल्थचें एक चिन्ह याच दृष्टीनें हिंदुस्थान राजाकडे पाहील. हिंदुस्थानला प्रजासत्ताक स्थितींतहि कॉमनवेल्थचें सदस्य रहातां यावें म्हणून आजवर जे मसुदे ( Formulae ) सुचविले गेले त्यांत पुढील दोन प्रमुख होत : एक म्हणजे हिंदुस्थानचा अध्यक्ष हाच आपोआप (*ipso facto*) बादशहाचा प्रतिनिधि व्हावा व त्यानें त्या दर्जाला अंगभूत असलेले अधिकार वापरावे; या पर्यायांत म्हटलें तर राजा आहे, म्हटलें तर नाहीं अशी स्थिति होणार होती. दुसरा मसुदा दुहेरी नागरिकत्वाच्या (Dual Citizenship) सिद्धान्तावर आधारला होता. या मसुद्यांत ब्रिटिश नागरिकत्वाची कल्पना प्रकटपणें होती. व ब्रिटिश राजा असलेले नागरिक ही कल्पना ध्वन्यर्थानें होती. या दोन योजनांपेक्षां आज मान्य झालेली योजना हिंदुस्थानच्या प्रजासत्ताक स्वरूपाशीं घटनाशास्त्रदृष्ट्या अधिक सुसंगत व म्हणून अधिक स्वागतार्ह आहे. कारण त्या योजनेंत Commonwealth मधील हिंदुस्थान सोडून इतर प्रत्येक राष्ट्राचा पंतप्रधान हा त्या ठिकाणचा His Majesty's Prime Minister राहील, तसा हिंदुस्थानचा पंतप्रधानाचा दर्जा नाहीं. शिवाय Commonwealth हें संघराज्य नसल्यानें Commonwealth चा प्रमुख (तो सुद्धा चिन्ह या नात्यानें) म्हणून राजा राहाणार असला तरी हिंदुस्थान या घटकापुरतें त्याला कांहींही घटनात्मक कार्य ( Function ) नाहीं. Commonwealth चें असें एकादें मंत्रिमंडळ असूं शकत नाहीं हें उघडच आहे. तेव्हां घटनात्मकदृष्ट्या हिंदुस्थानचा राजाशीं कोणताच संबंध नाहीं. त्यामुळें हिंदचा प्रजासत्ताक दर्जा अबाधित रहातो. Commonwealth हें विस्कळित असेंही संघराज्य नसून केवळ सौजन्यानेंच एका राष्ट्राच्या कायद्यांना कॉमनवेल्थमधील दुसऱ्या राष्ट्रांत मान दिला जाणार असल्यानें Commonwealth चें परस्परांविषयीं आदर व सहिष्णुता बाळगणाऱ्या मंडळासारखें स्वरूप ( Comity of peoples ) असें आहे.

### कॉमनवेल्थ कल्पनेचे कांहीं ऐतिहासिक टप्पे

वसाहतींचें स्वराज्य या कल्पनेचें थोडें विवेचन करून कॉमनवेल्थच्या कल्पनेंत आजचें परिवर्तन कसें झालें तें पाहूं. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धापासून ब्रिटननें बोध घेतला व वसाहतींच्या अंतर्गत प्रश्नांत फारशी ढवळाढवळ करावयाची नाहीं असें धोरण ठेवलें. शिवाय ब्रिटिशांच्या हाडामांसाच्या लोकांची संख्या दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व कानडा येथें भरीव प्रमाणांत असल्यानें या देशांशीं ब्रिटिशांचे संबंध उदार राहिले. पहिल्या महायुद्धांत या वसाहतींनीं भरीव मदत केल्यानें त्यांना स्वयंशासनाचे व्यापक अधिकार सौकर्यानें मिळाले व

त्यामुळें इंग्लंडशीं असलेला त्यांचा संबंध ऐतिहासिक दृष्ट्या गौरवाचा राहिल्यानें इंग्लंडच्या राजाविषयीं त्यांना वाटणारी आत्मीयता कायम राहिली व राजनिष्ठा हा कॉमनवेल्थ-राष्ट्रांना जोडणारा दुवा बनला. हिंदुस्थानसंबंधीं बोलावयाचें म्हणजे हिंदुस्थानांतील लोकांना स्वातंत्र्यपूर्वकालांतील ब्रिटनशीं असलेले संबंध गौरवाचे वाटत नसल्यानें प्रजासत्ताकाचा झेंडा फडकवावा असें भारतीय लोकांना स्वाभाविकपणें वाटत आहे. आज कॉमनवेल्थच्या सदस्य-राष्ट्रांना हिंदुस्थाननें कॉमनवेल्थमध्यें रहावें असें वाटत आहे व प्रजासत्ताकाच्या दर्जाशीं विसंगत नसेल तर हिंदुस्थानही कॉमनवेल्थमध्येंच रहाण्यास राजी आहे. या बेमालूम परिस्थितीमुळेंच कॉमनवेल्थची नवी कल्पना उदयास येऊं शकली. आतां तात्त्विक दृष्ट्या सीलोन व पाकिस्तान हिंदुस्थानच्या पावलावर पाऊल टाकूं शकतील; अर्थात् तसें करणें अधिक फायद्याचें (–अभिमानाचें नव्हे–) आहे अशी त्यांची खात्री झाली तरच ते वरील मार्ग पत्करतील असें वाटतें. स्वार्थासाठीं इंग्लंडमधील लोकांपेक्षांहि आपण अधिक राजनिष्ठ आहों असें हीं दोन राष्ट्रें म्हणणें अगदींच असंभाव्य नाहीं.

आतां आजच्या कल्पनेला आजचें स्वरूप येण्यास कोणते वैचारिक टप्पे गांठीत जावें लागलें तें पाहूं या. नवी कल्पना उदयाला येण्यास नुकतेंच होऊन गेलेलें आयर्लंड व आफ्रिका येथील वैचारिक मंथन कारणीभूत आहे असें मला वाटतें. १९२६ च्या इंपीरिअल कॉन्फरन्सनंतर वसाहतींचें वर्णन खालीलप्रमाणें करण्याचा प्रघात पडला आहे :—
'They are autonomous communities within the British Empire, equal in status, in no way subordinate one to another in any aspect of their domestic or external affairs, though united by a common allegiance to the Crown, and freely associated as the members of the British Commonwealth of nations.' ज्या Statute of Westminster ला the first document in the lawyer's sense of that term which determines inter-Imperial relations असें म्हणण्याचा प्रघात आहे त्या कायद्याच्या १ ल्या कलमांत फक्त कोणत्या राष्ट्रांना ही संज्ञा लागू होईल एवढेंच दिलें असून त्या कल्पनेचें तात्त्विक स्वरूप स्पष्ट केलेलें नाहीं. The Union of South Africa नें १९३४ सालीं Status of the Union Act करून Anson च्या The Law and Custom of the Constitution च्या चौथ्या आवृत्तींत म्हटलें आहे त्याप्रमाणें "The Union of South Africa has legislatively declared that the status enjoyed is that of *a soveriegn independent state*." आपल्या नव्या घटनेच्या उद्देशकथनांत Sovereign Independent State हेच शब्द वापरावे अशी सूचना डॉ. आंबेडकर आणणार असल्याचें मागें प्रसिद्ध झालें होतें.

### कॉमनवेल्थ–नागरिकत्वाची कल्पना

आयर्लंडनें गव्हर्नर-जनरलची जागा ( Office ) रद्द केली व राजनिष्ठेची शपथ गाळली, एवढेंच नव्हे तर सर्व वसाहतींना समान असलेली ब्रिटिश नागरिकत्वाची कल्पनाहि धुडकावून लावली. Anson च्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकांत आयर्लंडची भूमिका खालीलप्रमाणें दिली असून हिंदला राजनिष्ठेचें बंधन नसल्यानें नागरिकत्वासंबंधीं काय परिस्थिति नव्या करारानुसार निर्माण होईल याची साधारण कल्पना त्यावरून येऊं शकेल :
'In the view of the Government of the State the connection between the State and the Crown is not based on allegiance and under the Irish Nationality and Citizenship Act of 1935, provision is made for the repeal of the statute and common law of British nationality so for as it has bsen in force in Ireland. That measure extends the definition of citizenship as given in the Constitution under which the franchise and eligibility for membership of the legislators are confined to citizens. The Act and a conse-

qential amendment (26) of the constitution assert for Irish citizenship international validity."

दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या स्थितीवर या कराराचा काय परिणाम होईल या प्रश्नाला उत्तर देतांना सरदार पटेल म्हणाले कीं ती अधिक वाईट तरी होणार नाहीं! दक्षिण आफ्रिकेनें नागरिकत्वाचे अधिकार सांगणारा जो कायदा केला तो (१) British nationality व (२) Union domicile यांवर अधिष्ठित आहे. त्यांत कांहीं मामुली फेरफार होतील असा संभव आहे; अर्थात् त्या फरकांनीं 'जैसे थे (status quo)' राखलें जाईल. नागरिकत्वासंबंधीं यापुढें काय परिस्थिति राहील याबाबत सरदार पटेलांनीं पुढील उद्गार दि. २९ एप्रिलला प्रसिद्ध झालेल्या मुलाखतींत काढले आहेत: "Indians would not have British citizensnip under the agreement but the question of commonwealth citizenship would be determind by legislation passed by all units." 'लंडन टाइम्स'मध्यें पत्र लिहून जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनीं 'अतिथि–नागरिकत्वा (Guest citizenship)'-ची कल्पना पुरस्कारिली आहे. नागरिकत्वासंबंधीं कॉमनवेल्थ-नागरिकत्वाची नवी कल्पना उदयास येईल असें पटेलांनीं ध्वनित केलें आहे. शॉची कल्पना स्वीकारिली तर कॉमनवेल्थ सोडणाऱ्या राष्ट्रांचीहि सोय होईल. शॉ लिहितात: "May I suggest that aliens residing permanently within the commonwealth, enjoy all the rights and privileges and bear all the responsibilities of natives? This could be extended to any international combination; but its application to Ireland (and perhaps India) is urgent. —शॉनें हें करारापूर्वी सुचविलें होतें.

## कांहीं संभाव्य परिणाम

नागरिकत्वासंबंधानें ज्याप्रमाणें निश्चित कांहीं करारांत नाहीं त्याचप्रमाणें कॉमनवेल्थमधील राष्ट्रांतील हाय कमिशनरांचा हुद्दा (Designation) काय राहील तेंहि ठरवायाचें आहे. अनौपचारिक रीत्या या दोन प्रश्नांसंबंधीं कांहीं ठरलें असण्याचा संभव असल्यानें करारांत अव्याप्तीचे दोष (Faults of omission) राहिले असतीलच असें म्हणवत नाहीं. करारांत या बाबी स्पष्टपणें निर्देशिल्या नसल्याचें मोघमपणें म्हणतां येईल. पण ब्रिटिशांनीं संवर्धिलेल्या घटनाशास्त्रांत संकेतांचें स्थान महत्त्वाचें आहे हें विसरतां येत नाहीं. कॉमनवेल्थचें सदस्य राष्ट्र या नात्यानें हिंदुस्थानवर कोणतें बंधन येऊं शकेल याची कल्पना प्रो. ए. बी. कीथ यांच्या खालील उताऱ्यावरून येईल:

'The only obligation binding in honour and not in law on each dominion and the United Kingdom is that no unit of the commonwealth shall negotiate with foreign powers without informing all the other units, so that they may call attention to any interests of their own which may be involved; there is no obligation, however, on any unit to accept any suggestion which another may make.'

कम्युनिझमला पायबंद घालूं शकेल असें आशियांतील सर्वांत प्रभावी राष्ट्र हें हिंदुस्थानच असल्यानें हिंदुस्थानशीं मैत्रीचे संबंध ठेवण्याची वसाहत–राष्ट्रें कोशीस करतील असा संभव आहे. झालेल्या करारानें रशिया संशयग्रस्त झाल्यासारखा मात्र दिसत आहे; परंतु संरक्षणाच्या प्रश्नाबाबत परिषदेंत चर्चाच झाली नसल्यानें कॉमनवेल्थ राष्ट्रांना युद्धांत साहाय्य देण्यास हिंदुस्थान बांधलेला नाहीं. अँग्लो-अमेरिकन गटाचा कॉमनवेल्थ हा एक केवळ पोटभाग आहे असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. कदाचित् या कॉमनवेल्थला अमेरिकेला युद्धापासून कांहीं काळ थोपवून धरणेंही शक्य होईल. निदान आज तरी समान दर्जाचीं राष्ट्रें या नात्यानें पौर्वात्य व पाश्चात्य राष्ट्रें एकत्र गुंफल्याचें अपूर्व दृश्य दिसत आहे.

---

प्रा. वि. उ. चांदुरकर

# आंतरराष्ट्रीय बँक व हिंदुस्थान

बऱ्याच वर्षांनंतर आंतरराष्ट्रीय बँकविषयक शीर्षकें भारतीय वर्तमानपत्रांत झळकायला लागलीं आहेत. कारण हिंदुस्थाननें आपल्या अनेकविध आर्थिक योजनांसाठीं या बँकेकडे कर्जाची मागणी केली आहे. यामुळें या योजनांची प्रत्यक्ष पाहणी करण्यासाठीं बँकेनें आपलें एक शिष्टमंडळ हिंदुस्थानांत पाठविलें होतें. या शिष्टमंडळानें ठिकठिकाणच्या सरकारी अधिकाऱ्यांशीं, व निरनिराळ्या आर्थिक पक्षोपपक्षांच्या पुढाऱ्यांशीं बोलणीं केलीं. लवकरच या शिष्टमंडळाचें प्रतिवृत्त बँकेला सादर केलें जाईल व त्याप्रमाणें बँकेचे अधिकारी कर्जाबद्दल आपला निर्णय देतील. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यापासून दीर्घमुदतीच्या कर्जासाठीं हिंदुस्थाननें प्रथमच हा विदेशीयांपुढें हात पसरला असल्यामुळें या प्रश्नाबद्दल आर्थिक गोटांत बरेंच कुतूहल वाटत आहे. सकृद्दर्शनींच परकीय भांडवल देशांत आणणें ही साधारण वाचकाला अप्रिय घटना वाटते व तें साहजिकच आहे. हिंदुस्थान प्रत्येक बाबतींत स्वयंसंपन्न असावा अशी प्रत्येक व्यक्तीची इच्छा असणें स्वाभाविक आहे. मग हिंदुस्थान–सरकारनें बुद्धिपुरस्सर ही कर्जाची मागणी कां केली? त्यांत कोणते धोके आहेत? त्यामुळें व्याजाचें ओझें हिंदुस्थानवर किती पडेल? त्यामुळें हिंदुस्थान कांहीं राष्ट्रांच्या आर्थिक दडपणाखालीं येईल कीं काय? इत्यादि अनेक प्रश्न सामान्य वाचकाच्या समोर आज उभे आहेत. या प्रश्नांचा ऊहापोह होण्यासाठीं आंतरराष्ट्रीय बँकेसंबंधीं प्राथमिक ज्ञान वाचकाला असणें आवश्यक आहे.

### आंतरराष्ट्रीय बँकेचें उद्दिष्ट

या बँकेचें पूर्ण नांव International Bank of Reconstruction and Development हें असून १९४४ सालच्या ब्रेटन-वुड्स-परिषदेंतील विचारविनिमयानंतर त्यांतून जन्मलेल्या दोन जुळ्या संस्थांपैकीं ही एक आहे. त्यापैकीं दुसरी संस्था आंतरराष्ट्रीय मौद्रिक निधि (International Monetary Fund) ही असून आंतरराष्ट्रीय व्यापारी देवघेवीमुळें उत्पन्न होणाऱ्या हुंडणावळीच्या दरांतील विषमता कमींत कमी करणें हा या संस्थेचा उद्देश आहे. यासाठीं अल्पकालीन कर्जें देऊन कर्जदार राष्ट्राला असलेली तात्पुरती विनिमयासंबंधीं अडचण ही संस्था दूर करते. याच संस्थेबरोबर आंतरराष्ट्रीय बँकेचाहि जन्म झाला. ज्यांची आर्थिक घडी युद्धामुळें विस्कटलेली आहे किंवा अन्य कारणामुळें ज्यांची आर्थिक प्रगति केवळ अंशतःच होऊं शकली आहे अशा राष्ट्रांना दीर्घ मुदतीच्या कर्जांचा पुरवठा करून त्यांची आर्थिक भरभराट होण्याला मदत करणें हें या बँकेचें ध्येय आहे.

आंतरराष्ट्रीय बँक ही राष्ट्रांतील सहकाराच्या तत्त्वावर आधारली असल्यामुळें खाजगी आंतरराष्ट्रीय कर्जें देण्याच्या पद्धतीची विरोधक नाहीं. याउलट खाजगी भांडवल योग्य मार्गांनीं गुंतविण्यास सोयी व सवलती देणें हें या बँकेचें प्रमुख कार्य आहे. बँकेच्या कराराचें कलम १–२ प्रमाणें "खाजगी कर्जें प्रत्याभूत (Guaranteed) करून किंवा त्यांत भागीदारी करून खाजगी भांडवलाच्या विदेशी व्यवहाराचा विकास करणें आणि जेव्हां खाजगी भांडवल रास्त अटींवर मिळणें अशक्य असेल तेव्हां स्वतःच्या भांडवल–व–संचिती (Reserves) मधून योग्य अटींवर कर्जांचा पुरवठा करणें," हें बँकेचें प्रमुख उद्दिष्ट होय. यावरून हें दिसून येईल

कीं बँक खाजगी भांडवलदार राष्ट्रांच्या विरुद्ध नसून त्यांचें भांडवल योग्य व रास्त अटींवर गरजू राष्ट्रांना मिळवून देणारी व त्या व्यवहारांवर देखरेख करणारी संस्था आहे. शिवाय जेव्हां खाजगी रीत्या भांडवल उपलब्ध नसेल तेव्हां स्वतःच्या पुंजीमधून उत्पादक कार्याकरितां भांडवल-पुरवठा देखील ती करते.

बँकेच्या सदस्यत्वाची मुख्य अट ही आहे कीं प्रत्येक सदस्य आंतरराष्ट्रीय मौद्रिक निधी—(I.M.F.)-चाहि सदस्य असला पाहिजे. ही अट एवढया-साठींच घालण्यांत आली आहे कीं, भांडवलांच्या व्यवहारांत हुंडणावळाविषयक अडचणी येऊं नयेत. सदस्य राष्ट्रांतील हुंडणावळींचे दर स्थिर ठेवण्याचें कार्य हा निधि पहात असतो. यामुळें निधीच्या सदस्य-राष्ट्रांत भांडवलाचे व्यवहार करणें अधिक सोयीचें आहे.

आंतरराष्ट्रीय बँकेचें अधिकृत भांडवल १००० कोटि डॉलर असून तें १ लक्ष डॉलरच्या १ लक्ष अंशांत (Shares) विभागलेलें आहे. प्रत्येक सदस्य राष्ट्राला कांहीं ठराविक प्रमाणांतच भांडवल स्वीकृतीसाठीं दिलें आहे. एकंदर स्वीकृत भांडवल ३० जून १९४८ रोजीं ८२८ कोटी डॉलर होते. त्यांपैकीं सर्वांत मोठा हिस्सा ३१७ कोटी डॉलर किंवा एकंदर स्वीकृत भांडवलाच्या शेकडा ३८ टक्के 'संयुक्त संस्थानांचा' आहे. याशिवाय ग्रेट ब्रिटनचा हिस्सा शे. १४·३, चीनचा शे. ६·६ व फ्रान्सचा शे. ४·९ प्रमाणांत आहे. हिंदुस्थानचा हिस्सा ४० कोटि डॉलर किंवा शे० ४·८ टक्के आहे. आंतरराष्ट्रीय बँक ही 'सीमित देय-(Limited Liability)—संस्थे'प्रमाणें असून त्यांतील प्रत्येक सदस्य राष्ट्राची जास्तींत जास्त जबाबदारी त्याच्या स्वीकृत भांडवलाइतकी आहे. परंतु त्याच्या कर्ज घेण्याच्या पात्रतेवर मात्र कसलेच निर्बन्ध नाहींत; म्हणजे जर एकाद्या राष्ट्राची उत्पादक गरज त्याच्या स्वीकृत भांडवलापेक्षां जास्त असेल तरी त्याला बँकेच्या साहाय्यानें तितकें कर्ज मिळविण्यास कसलाच प्रत्यवाय नाहीं.

प्रत्येक सदस्य राष्ट्राला त्याच्या हिस्स्याच्या स्वीकृत भांडवलाच्या शे. २० टक्के भांडवल प्रथम द्यावें लागतें. त्यापैकीं २ टक्के सोनें किंवा सं. संस्थानांच्या डॉलरच्या रूपांत व बाकीचें १८ टक्के आपल्या चलार्थांत (home currency) द्यावें लागतें. बाकीचें ८० टक्के स्वीकृत भांडवल बँकेची संचिति (Reserve) म्हणून असून गरज पडेल तेव्हां बँक त्याची मागणी करूं शकते. साधारणतः एकाद्या कर्जदारानें जर कर्ज बुडाविलें तर त्याची भरपाई करण्यासाठीं या अनाहूत (uncalled) भांडवलाचा उपयोग करण्यांत येईल. यासाठीं हें निश्चित करण्यांत आलें आहे कीं बँकेच्या एकंदर स्वीकृत भांडवलापेक्षां जास्त कर्जाची जबाबदारी बँक घेणार नाहीं. म्हणजे या बँकेच्या स्थापनेमुळें प्रत्येक कर्ज देणाऱ्या धनको राष्ट्राला अशी पूर्ण शाश्वती देण्यांत आली आहे कीं त्याचें कर्ज कर्जदारानें जरी बुडाविलें तरी त्याची फेड बँक आपल्या भांडवलांतून करील.

अशा रीतीनें प्रत्येक सदस्य राष्ट्रापासून २० टक्के स्वीकृत भांडवल गोळा करून बँकेनें १६,५७२ लक्ष डॉलर 'परिदत्त-भांडवल (Paid-up capital)' जमविलें आहे. इतक्या अल्प परिदत्त भांडवलावर जागतिक बँकेचे व्यवहार कसे चालतील अशी सुरवातीला शंका प्रदर्शित करण्यांत आली होती. विशेषतः या सर्व भांडवलांत डॉलरच्या रूपांत फक्त ७,३०० लक्ष डॉलर किमतीचें भांडवल होतें. आजच्या जगांत वहुतेक सर्वत्र फक्त डॉलर कर्जाची मागणी बँकेकडे होते. यामुळें बँकेचें परिदत्त भांडवल फारच अपर्याप्त आहे असें वाटणें सहाजिक आहे. परंतु याचें शंकानिरसन करण्यासाठीं बँकेची कर्ज देण्याची रीति काय आहे हें पाहणें आवश्यक आहे.

### बँकेचे कर्ज देण्याचे नियम

बँकेच्या कर्जविषयक तीन रीती आहेत :—

(१) खाजगी कर्जें देण्याचे व्यवहार बँकेच्या मध्यस्थीनें झाल्यास ऋणको व धनको राष्ट्रांच्या हितार्थ बँक या कर्जाची जबाबदारी स्वतःवर घेते. याला प्रत्याभूत कर्जें (Guaranteed loans) म्हणतात. (२) एकाद्या विशिष्ट राष्ट्राच्या चलार्था-(currency) साठीं विशेष मागणी असल्यास बँक आपले कर्जरोखे त्या राष्ट्राच्या संमतीनें त्या राष्ट्रांतील भांडवल-बाजारांत विकून कर्ज उभारत व त्यांतून गरजू राष्ट्रांना कर्जें देते. याचा अर्थ असा

कीं गरजू राष्ट्राची पत कमी असल्यास तें बँकेच्या पतीचा उपयोग करून आवश्यक तें कर्ज मिळवूं शकते. आजपर्यंत बँकेनें अशा रीतीनें फक्त न्यू यॉर्कमध्येंच कर्जे उभारलीं आहेत. कारण फक्त डॉलर्सचीच मागणी सर्वांत जास्त आहे. (३) वरील दोन्ही मार्ग उपलब्ध नसल्यास स्वतःच्या भांडवलांतून गरजू राष्ट्रांना बँक कर्ज देते.

कर्जे देतांना बँक केवळ आर्थिक कारणांचाच विचार करते. राजकीय आपपरभावापासून बँकेची कर्जें देण्याची नीति सर्वस्वी अलिप्त आहे. बँक केवळ पुनर्निर्माणयोजनांसाठीं किंवा मागसलेल्या राष्ट्रांच्या विकासयोजनासाठींच कर्जे देईल व त्याच्या युद्धकार्याकरितां किंवा तत्सम इतर राजकीय कामाकरितां दुरुपयोग होऊं देणार नाहीं. राजकीय झगड्यांपासून स्वतःला सर्वथा अलिप्त ठेवण्याचें बँकेचें हें धोरण फार महत्त्वाचें आहे. परंतु याबद्दल मोठी शंका प्रदर्शित केली जाते. १९४७ सालीं इंडोनेशियाच्या विरुद्ध अन्यायपूर्ण युद्ध सुरू केल्यानंतर बँकेनें नेदर्लॅन्डसला १९॥ कोटि डॉलरचें कर्ज मंजूर केलें त्यावेळीं या आक्रमक राष्ट्राला मदत केल्याबद्दल बँकेच्याविरुद्ध मोठा रोष व्यक्त करण्यांत आला. परंतु बँकेच्या अधिकाऱ्यांनीं खुलासा केला कीं, हें कर्ज केवळ आर्थिक पुनर्निर्माणाच्या कार्याकरितांच दिलेलें आहे, याचा इंडोनेशियाच्या युद्धाशीं संबंध नाहीं. परंतु त्याच वर्षी पोलंडच्या सरकारनें ६० कोटि डॉलरच्या कर्जाची मागणी बँकेकडे केली असतां बँकेनें पोलंडला कर्ज नाकारल्याचें कळतें. पोलंडला कर्ज नाकारण्याचें कारण सुस्पष्ट आहे. पोलंड रशियाच्या आधिपत्याखालीं असल्यामुळें अमेरिकेच्या आधिपत्याखालीं असलेल्या आंतरराष्ट्रीय बँकेनें त्याला राजकीय द्वेषामुळें कर्ज दिलें नाहीं असा आरोप बँकेवर केला जाऊं शकतो.

## बँकेनें दिलेलीं कर्जें

१९४६ सालीं बँकेचा कारभार सुरू झाल्याला आतां दोन वर्षें होऊन गेलीं आहेत. परंतु एवढ्या अल्पकाळांतहि बँकेनें ७०० ते ८०० कोटि डॉलरचीं कर्जें दिलीं आहेत. त्यापैकीं सर्वांत जास्त कर्जें पश्चिम युरोपीय राष्ट्रांना त्यांच्या पुनर्निर्माण-योजनांसाठीं देण्यांत आलीं आहेत. सर्वांत प्रथम कर्ज बँकेनें मे १९४७ मध्यें फ्रान्सला दिलें. हें कर्ज २५ कोटि डॉलर्सचें असून फ्रान्सच्या सरकारनें त्याची हमी दिली आहे. कर्जाची मुदत ३० वर्षें असून, पांच वर्षांनंतर कर्जफेडीचे हप्ते भरावयाचे आहेत. या कर्जाला दरसाल दर शेंकडा व्याजाचा दर ३। असून शिवाय वर शेंकडा १ बँकेची संचिति (Reserve) निर्माण करण्यासाठीं वर्तनहि (Commission) आकारण्यांत येतें. जवळपास याच अटींवर बँकेकडून नेदरलॅन्ड्स्, डेन्मार्क, लक्झेंबर्ग आणि चिली या राष्ट्रांना कर्जें मंजूर करण्यांत आलीं आहेत. अशा रीतीनें आंतरराष्ट्रीय बँक ही आंतरराष्ट्रीय आर्थिक सहकाराचें नवें प्रतीक आहे.

## आंतरराष्ट्रीय बँक व हिंदुस्थान

गेल्या महिन्यांत मध्यवर्ती सरकारच्या फडणिसांनीं आंतरराष्ट्रीय बँकेकडे कर्जाची मागणी केल्याचें सांगितलें. या कर्जाची मागणी किती डॉलरची आहे किंवा हिंदुस्थानला किती कर्ज मिळूं शकेल याबद्दलची माहिती अजून उपलब्ध नाहीं. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विकासयोजनांसाठीं लागणारें भांडवल-सामान परदेशांतून आयात करण्यासाठीं आवश्यक असलेला विदेशी विनिमय मिळावा म्हणून ही कर्जाची मागणी करण्यांत आली आहे. या विकासयोजनांत पडित जमिनीची मशागत करणें, नलीकूप (Tubewell) खोदणें, मच्छीमारी धंद्याची उन्नति करणें, जलविद्युत् व कालव्यांच्या योजना, लोहमार्गासाठीं एंजिनें विकत घेणें, शेतीसाठीं ट्रॅक्टर्स मिळविणें इत्यादि कामांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे.

हिंदुस्थान-सरकारनें परकीय भांडवल हिंदुस्थानांत आणण्याचा हा जो उपक्रम चालविला आहे त्याबद्दल जनतेंत दुमत असणें स्वाभाविक आहे. साधारणपणें प्रत्येक हिंदी माणसाला परकीयांची अशा कामीं मदत घेणें विचित्र वाटेल! परकीय दास्यांतून नुकतेंच मुक्त झाल्याबरोबर पुन्हां त्यांच्या आर्थिक दास्यांत स्वतःला गुंतवून घेण्याचा सरकारचा हा खटाटोप वरवर तरी आश्चर्यकारक

वाटतो. परंतु आजच्या हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीकडे पाहिल्यास तें आश्चर्य बरेंच कमी होतें.

हिंदुस्थानची नैसर्गिक संपत्ति बरीच विपुल असली तरी तिचा आर्थिक विकास नीट न झाल्यामुळें हिंदुस्थानचें उत्पादन फार कमी आहे हें सर्वश्रुतच आहे. यामुळें उत्पादन वाढविण्यासाठीं व देशाचा आर्थिक विकास करण्यासाठीं सरकारनें अनेक योजना मंजूर केल्या आहेत. त्या कार्यान्वित करण्यासाठीं परदेशांतून उत्पादक स्वरूपाचा माल मागविणें अत्यंत आवश्यक आहे. परंतु ही आयात करण्यासाठीं लागणारा विदेशी विनिमय आपल्यापाशीं नसल्यामुळें मोठी अडचण निर्माण झाली आहे. अर्थात या अडचणींतून मार्ग काढण्याकरितांच हें कर्ज उभारण्यांत येत आहे.

वस्तुतः आपल्याला विदेशी विनिमयाची अशी तूट भासावयास नको. कारण साधारणतः हिंदुस्थानची निर्यात आयातीपेक्षां जास्त असल्यामुळें आपण धनको राष्ट्र असतों. परंतु गेल्या युद्धकाळापासून विदेशी व्यापाराची बाकी हिंदुस्थानला प्रतिकूल व्हावयास लागली आहे. कारण वर्षानुवर्षे आपणांस अन्नाची फार मोठ्या प्रमाणावर आयात करावी लागत आहे. गत वर्षांत, उदाहरणार्थ, आपण १३० कोटि रुपयांच्या विदेशी विनिमयाचा उपयोग केवळ अन्नाची आयात करण्यासाठीं केला. यामुळें भांडवल-वस्तूंची आयात करण्यास पुरेसा विनिमय-संचय शिल्लक राहात नाहीं. याशिवाय आपल्या स्टर्लिंग शिलकेच्या रकमा देखील या कामीं उपयुक्त होऊं शकल्या असत्या. परंतु स्टर्लिंग-विषयक कराराप्रमाणें त्या रकमा अडविण्यांत आल्या असून त्यापैकीं फारच थोडा स्टर्लिंगविनिमय या कामीं उपयोगीं येतो. याचा अर्थ असा कीं जोंपर्यंत हिंदुस्थानचें हें अन्नासाठीं परावलंबन चालू आहे तोंपर्यंत विनिमयाची तूट ही अशीच राहणार. यासाठीं अन्नोत्पादन व इतर निर्यातीच्या वस्तूंचें उत्पादन देशांत शीघ्रातिशीघ्र वाढणें अत्यावश्यक आहे. परंतु त्यासाठीं अगोदर आपल्या विकास-योजना कार्यान्वित होणें अवश्य आहे. आणि म्हणून आपण परकीय राष्ट्रांपासून कर्ज घेऊनहि का होईना, विकासयोजनांसाठीं लागणारा माल देशांत शक्य तितक्या लवकर मिळविणें जरूरीचें आहे. अशा रीतीनें परदेशी भांडवल देशांत आणणें वाईट असलें तरी हल्लीं हिंदुस्थान अशा आर्थिक संकटांत सांपडला आहे कीं विदेशी भांडवलाच्या मदतीनें का होईना पण उत्पादन वाढविल्याशिवाय त्याला गत्यंतर नाहीं. म्हणून सरकारनें दूरदृष्टीनें बँकेपासून कर्ज मागण्याचा जो निर्णय घेतला आहे तो सर्वथा स्वागतार्ह आहे असेंच म्हटलें पाहिजे.

याशिवाय आणखीही एक फरक लक्षांत घेतला पाहिजे. ब्रिटिशांच्या अमदानींत ब्रिटिश भांडवल हिंदुस्थानांत फार मोठ्या प्रमाणावर आलें. त्यावेळीं विदेशी भांडवलदारांना स्वतःच्या मालकीचे कारखाने, खाणी, चहा-कॉफीचे मळे आणि रेल्वे कंपन्या स्थापण्यास सरकार प्रोत्साहन देत असे. परंतु अशा रीतीनें भांडवलाची देशांत आयात करणें राष्ट्रहिताला सर्वस्वीं घातक होतें. कारण त्यामुळें राष्ट्रीय संपत्तीच्या विकसनाचा लाभ बव्हंशीं परकीयांना प्राप्त होतो. परंतु ज्या अटींवर बँकेपासून कर्ज मागण्यांत आलें आहे त्यांत वरील प्रकारचें दास्य अभिप्रेत नाहीं. या कर्जामुळें बँकेच्या पतीचा देशाला लाभ मिळून विदेशांतून आवश्यक असलेला भांडवल-माल ( Capital Goods ) आपणास आयात करतां येईल. या खेरीज अशा भांडलवलाच्या व्यवहारांत एका विशिष्ट राष्ट्राचें दास्य अंतर्हित नाहीं; कारण बँकेच्या व्यवहारांत आज जरी 'संयुक्त संस्थानां'ना महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें असलें तरी बँक ही सर्व सदस्य राष्ट्रांची संस्था आहे. म्हणून तिच्यापासून कर्ज घेण्यामुळें आपलें राष्ट्र इतरांच्या राजकीय किंवा आर्थिक दडपणाखालीं येण्याची शक्यता कमी आहे. आणखी तिसरें एक कारण आहे. समजा, या व्यवहारांच्या कांहीं अप्रिय बाजू आहेत. तरी पण बँकेच्या घटनेप्रमाणें जर एकाद्या कर्जदार राष्ट्रानें घेतलेल्या कर्जाची परतफेड केली नाहीं तर बाकीच्या सदस्य राष्ट्रांच्या स्वीकृत भांडवलांतून त्या कर्जाची फेड केली जाऊं शकते. तेव्हां जर इतर राष्ट्रें या बँकेपासून भरपूर फायदा घेताहेत तर केवळ तात्त्विक सोवळेपणामुळें हिंदुस्थाननें हें कर्ज नाकारणें सर्वस्वीं अनिष्ट आहे.

## हिंदुस्थानला दीर्घकालीन कर्ज लागेल

हिंदुस्थान-सरकारनें बँकेपासून किती डॉलरचें कर्ज मागितलें आहे किंवा मागणार आहे याची माहिती अजून उपलब्ध! नाहीं. परंतु मागणीइतकें कर्ज हिंदुस्थानला मिळूं शकेल असें सांगतां येत नाहीं. आजपर्यंत बँकेनें कधींच अर्जांतील कर्जाचा आंकडा मंजूर केला नाहीं. बहुतेक राष्ट्रांना अर्ध्यापेक्षांहि कमी कर्ज मिळूं शकलें.

याशिवाय बँकेचे व्याजाचे दरहि हल्लीं फार जास्त आहेत. बँक साधारपणें ३। ते ३॥ दरानें व्याज आकारते आणि वर शेकडा १ दरानें संचिति ( Reserve ) निर्माण करण्यासाठीं वर्तनहि ( Commission ) आकारतें. एकंदर ४। ते ४॥ टक्के व्याज देणें हें बाजाराच्या प्रस्तुत परिस्थितींत अत्यंत महाग आहे. १९४६ सालीं 'संयुक्त संस्थानां'नीं इंग्लंडला ३७५ कोटि डॉलरचें ५० वर्षांकरितां कर्ज दिलें. पण त्यावर व्याजाचा दर शेंकडा २ आहे. यामुळें वरील बँकेचा व्याजाचा दर फार जास्त आहे हें सिद्ध आहे. परंतु याबद्दल बँकेचें स्पष्टीकरण असें आहे कीं, बँकेला कर्ज देण्यासाठीं आवश्यक डॉलर न्यू यॉर्कमध्यें स्वतःचे कर्जरोखे विकून मिळवावे लागतात. न्यूयॉर्क भांडवल-बाजाराची परिस्थिति हल्लीं इतकी तंग आहे कीं बँकेलाहि तेथें शेकडा ३ दराच्याखालीं कर्ज मिळत नाहीं; यामुळें साहाजिकच ३। ते ३॥ दारानें कर्ज द्यावें लागतें.

हें असें असलें तरी बँकेनें हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीकडे लक्ष देणें आवश्यक आहे. आजपर्यंत बँकेकडे कर्जाची मागणी करणारीं राष्ट्रें उद्योग-प्रधान युरोपीय राष्ट्रें होतीं. आशियांतील राष्ट्रांपैकीं बँकेला कर्ज मागणारें हिंदुस्थान हें पाहिलेंच राष्ट्र आहे. जपानखेरीज आशियांतील राष्ट्रें कृषिप्रधान आहेत. हिंदुस्थानला कर्जाची आवश्यकता ज्या विकासयोजनांसाठीं आहे, त्यापैकीं बहुतेक सर्व कृषिविषयक योजना आहेत. कृषिविषयक योजनांचा एक विशेष असा असतो कीं त्या योजना स्वयंसंपन्न होण्यास आणि त्यांतून नफा मिळवण्यास औद्योगिक योजनांपेक्षां जास्त कालावधि लागतो. यामुळें आपलें कर्ज हें इतर राष्ट्रांपेक्षां दीर्घ मुदतीचें असणें जरूर आहे. व म्हणूनच त्यावर व्याजाचा दरहि कमी असणें आवश्यक आहे. औद्योगिक व कृषिविषयक कर्जांतील ह्या मूलभूत फरकाकडे बँक दुर्लक्ष करणार नाहीं अशी अपेक्षा आहे. कारण मार्च १९४८ मध्यें बँकेनें चिलीला जें कर्ज दिलें त्यापैकीं २५ लक्ष डॉलरचें कृषिविषयक योजनांसाठीं होतें. त्याची मुदत ६॥ वर्षें असून व्याजाचा दर २॥ टक्के आहे.

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, आंतरराष्ट्रीय बँक ही गरजू राष्ट्रांना पुनर्निर्माण व आर्थिक विकसन यासाठीं दीर्घ मुदतीचीं कर्जें देऊन त्यांचा आर्थिक उत्कर्ष घडवून आणणारी अत्यंत उपयुक्त संस्था आहे. गरजू राष्ट्रांप्रमाणेंच ज्यांच्यापाशीं कर्जाऊ भांडवल मुबलक आहे अशा धनवान् राष्ट्रांनाहि पैसा गुंतविण्यासाठीं सुरक्षित गिऱ्हाइकें मिळवून देणें हीहि बँकेची महत्त्वाची सेवा आहे. आंतरराष्ट्रीय आर्थिक सहकाराच्या तत्त्वावर बँकेची संघटना झाली असून त्यामुळें सर्व सदस्य राष्ट्रांना भांडवलाची आयात करणें फार सुकर झालें आहे. हिंदुस्थाननें हल्लीच्या पेंचप्रसंगांतून स्वतःची सुटका करण्याकरितां बँकेकडे कर्जाची मागणी केली आहे. या कर्जामुळें हिंदुस्थानला आवश्यक असलेली शेतकी व औद्योगिक यंत्र-सामग्री लवकर मागवतां येईल व त्यामुळें देशांतील मोठमोठ्या विकासयोजना कार्यान्वित होण्यास मदत होईल.

---

हिंदुस्थानांत गुरांची संख्या २५ कोट आहे— हिंदुस्थानांत जें दूधदुभतें होतें तें दर माणसास ५ औंस पडतें; अमेरिकेंत प्रमाण याच्या चौपट आहे.

—श्री. जयरामदास दौलतराम, (६-३-४९)

आचार्य शं. द. जावडेकर

# सत्याग्रही समाजवाद : कांहीं प्रश्नोत्तरें

[ता. ३० एप्रिल रोजीं दादरच्या वसंतव्याख्यानमालेंत वरील विषयावर माझें व्याख्यान झालें. त्यावेळीं श्रोत्यांनीं मला अनेक प्रश्न विचारले. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांना उत्तरें तेथेंच दिलीं. इतर कांहीं प्रश्नांचीं उत्तरें येथें प्रसिद्ध करीत आहे. तीं सामान्यतः सर्व जिज्ञासु वाचकांना उद्बोधक वाटतील अशी आशा आहे. —लेखक]

**प्रश्न १ लाः—** (अ) उच्च प्रकारच्या नीतिमान् सत्याग्रही समाजवादी राष्ट्राजवळ लष्करी सामर्थ्य असावें का?

(आ) अशा प्रकारच्या लष्करी सामर्थ्यावर ज्यांची सत्ता आहे त्यांना त्याचा स्वार्थासाठीं वापर करावा अशी इच्छा होणार नाहीं का?

(इ) उच्च नीतिमान् आणि निःस्वार्थी अशा चार पांच मुत्सद्द्यांनीं राष्ट्राचा कारभार चालवावा याविषयीं आपलें काय मत आहे?

**उत्तरः—** (अ) जोंपर्यंत जगांतील सर्व राष्ट्रांचें एक राज्य झालेलें नाहीं, तोंपर्यंत उच्च प्रकारच्या नीतिमान् सत्याग्रही समाजवादी राष्ट्राजवळहि लष्करी सामर्थ्य असणें अपरिहार्य व आवश्यक आहे. हें राष्ट्र सत्याग्रही, समाजवादी असलें तरी त्यापैकीं सत्याग्रही लोकांनीं हें लष्करी सामर्थ्य आपल्या हातीं ठेवूं नये व घेऊं नये. तें समाजवादी पक्षाच्या हातीं द्यावें आणि तो पक्ष आपल्या समाजवादी तत्त्वानुसारच त्या सामर्थ्याचा उपयोग करीत असेल तोंपर्यंत त्याला तसें करूं द्यावें.

(आ) ज्यावेळीं हा समाजवादी पक्ष स्वार्थासाठीं त्या लष्करी सत्तेचा उपयोग करूं लागेल त्यावेळीं त्याच्या सत्तेशीं अनत्याचारी असहकार करण्याचें शिक्षण जनतेला व सर्व राष्ट्रिकांना देण्याचें कार्य सत्याग्रही लोकांनीं करीत रहावें. या सत्याग्रही लोकांचें व प्रजाजनांचें अनत्याचारी असहकाररूपी दडपण अशा सत्ताधारी पक्षाला कर्तव्यच्युत होऊं देणार नाहीं व तो कर्तव्यच्युत झाल्यास पदभ्रष्ट करून त्याच्या विरोधी पक्षास प्रजेनें सत्ताधारी बनवावें.

(इ) उच्च नीतिमान् आणि निःस्वार्थी अशा चार पांच मुत्सद्द्यांनीं राष्ट्राचा कारभार चालवावा, हें म्हणणें मला पटत नाहीं. प्रत्येक वेळीं चार पांच मुत्सद्द्यांचें वर्चस्व असलेलेंच मंत्रिमंडळ असतें. पण हें मंत्रिमंडळ लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधि-सभेस जबाबदार असलें पाहिजे. ह्या प्रतिनिधि-सभेंत त्याला एक विरोधी पक्ष असावा. या विरोधी पक्षांतहि त्याच्या धोरणाचे चार-पांच प्रमुख मुत्सद्दी असतील. जेव्हां पहिलें मंत्रिमंडळ प्रतिनिधि-सभेचा विश्वास गमावील तेव्हां दुसऱ्या पक्षाच्या मुत्सद्द्यांनीं पहिल्या मंत्रिमंडळास अधिकारभ्रष्ट करून आपल्या हातीं सत्ता घ्यावी हीच पद्धति योग्य आहे.

**प्रश्न २ राः—** हल्लींच्या असेम्ब्लींत विरोधी पक्ष (Opposition Party) नाहीं. तर ही असेंब्ली 'फॅसिस्ट' आहे असें आपण म्हणाल काय?

**उत्तरः—** एकाद्या असेम्ब्लींत सर्व सभासद एकाच पक्षाचे निवडून आले, एवढ्यानेंच केवळ त्या असेंब्लीला फॅसिस्ट म्हणतां येणार नाहीं. जोंपर्यंत ह्या असेंब्लीनें विरोधी पक्षाच्या निवडणुकीचा हक्क काढून घेतलेला नाहीं आणि विरोधी पक्ष संघटित करणाऱ्या नागरिकांचें अनत्याचारी संघस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य व प्रचार-स्वातंत्र्य हिरावून

घेतलें नाहीं तोंपर्यंत अशा असेंब्लीला फॅसिस्ट म्हणतां येणार नाहीं. मात्र त्या असेंब्लींत विरोधी पक्ष नसल्यामुळें फॅसिस्ट प्रवृत्ति बळावण्याचा धोका आहे.

**प्रश्न ३ रा:—** आपल्या देशांत लोकशाही-निर्मितीसाठीं चार वर्ण प्रथम नष्ट केले पाहिजेत कीं दोन वर्ग प्रथम नष्ट केले पाहिजेत ? आणि चार वर्ण कोणत्या मार्गानें नष्ट होतील ?

**उत्तर:—** माझ्या मतानें आपल्या देशांतील चार वर्ण आधींच नष्ट झालेले आहेत. फक्त कांहींना आपल्या वर्णासंबंधीं अहंकार आहे. तो अहंकार नष्ट झाला म्हणजे संपलें. दोन वर्ग नष्ट करणें हाच आपल्यापुढील प्रश्न आहे. व हे दोन वर्ग नष्ट करण्यास उत्पादनाचीं साधनें सार्वजनिक मालकीचीं बनविणें हाच मार्ग आहे.

**प्रश्न ४ था:—** गांधीवाद अथवा सर्वोदयवाद आपल्या देशाला अत्यंत पोषक आहे हें जरी खरें असलें तरी गांधीजींच्या मरणोत्तर त्या वादाच्या प्रसाराला फारच कमतरता आलेली दिसत आहे. मग त्या वादाचें भवितव्य काय समजावें ?

**उत्तर:—** ज्यांचा त्या वादावर विश्वास असेल त्यांनीं त्या वादाच्या तत्त्वानुसार आपलें वर्तन ठेवावें आणि देशांतील राज्यसत्ता निष्ठावंत, लोकशाही समाजवादी पक्षाच्या हातीं शक्य तों लवकर जाईल अशी खटपट करावी. स्वतः राज्यसत्ता आपल्या हातीं घेऊं नये आणि राज्यसत्ता धारण करणाऱ्या अथवा करूं इच्छिणाऱ्या कोणत्याहि पक्षाचें सभासद स्वतः राहूं नये. समाजवाद स्थापन करणें व तो त्वरित करणें हेंच गांधीवादाच्या उज्ज्वल भवितव्याचें खरें साधन आहे.

**प्रश्न ५ वा:—** (अ) हिंदुस्थानांत समाजवाद आणण्यासाठीं क्रांति करावी लागेल का ? लागेल तर ती कोणत्या प्रकारची असणार ?

(आ) अहिंसा आजच्या सरकारला पाळतां येईल काय ?

(इ) आज समाजवादी पक्षांत कांहीं संधिसाधु लोक शिरत आहेत, त्यामुळें समाजवादी पक्षाची कॉंग्रेससारखी अवस्था होणार नाहीं काय ?

**उत्तर: —(अ)** हिंदुस्थानांतील समाजवादी क्रांति तीन प्रकारें होणें शक्य आहे असें क्षणभर मानतां येईल. पहिला प्रकार म्हणजे कोणताही कायदा उल्लंघन न करतां केवळ समाजवादी कायदे कायदेमंडळांत मंजूर करून त्यांची अंमलबजावणी करणें. याला केवळ कायदेशीर मार्ग म्हणतां येईल. पण अशा कायदेशीर मार्गानें समाजवाद आणण्याचे प्रयत्न करणाऱ्या लोकांचे मूलभूत राष्ट्रिक हक्क हिरावून घेणारे जुलमी कायदे केल्यास त्यांचें उल्लंघन केल्यावांचून समाजवाद्यांना आपलें कार्य करतां येणार नाहीं. म्हणून जुलमी कायदे उल्लंघन करून आपलें क्रांतीचें कार्य पुढें कसें चालवावें असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचीं दोन उत्तरें आहेत. एक अनत्याचारी असहकाराचा मार्ग आणि दुसरा सशस्त्र क्रांतीचा मार्ग. माझ्या मतानें हिंदुस्थानांतील समाजवाद्यांनीं अनत्याचारी असहकाराच्या मार्गानें समाजवादी क्रांति करण्याचा निर्धार करावा. असा निर्धार ते करतील तर त्यांना यश येईल अशी परिस्थिति या देशांत आहे. असें असल्यामुळें सशस्त्र क्रांतीचा मार्ग येथें अवलंबिणें राष्ट्राला व समाजाला विघातक आहे. त्यामुळें समाजद्रोह व राष्ट्रद्रोह केल्यासारखें होतें. शिवाय सशस्त्र क्रांतींतून एकपक्षीय हुकुमशाही येण्याचा व रशियाचें दास्य पत्करावें लागण्याचा धोका आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्य व लोकशाही यांना धोक्यांत न आणतां समाजवादाची स्थापना करण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे भांडवलशाहीशीं अनत्याचारी असहकार किंवा सत्याग्रही मार्ग होय.

**प्रश्न ६ वा:—** सत्याग्रही लोकांनीं राजदंड धारण केल्यास त्यांना अपरिहार्य हिंसा करावी लागणार आणि त्यामुळें समाजाची धारणा होणार नाहीं असें आपलें मत आहे. परंतु "असत्य" आणि "अन्याय" याला "दंड" दिल्यास ती एक प्रकारची अहिंसाच नव्हे काय ? आणि त्या दृष्टीनें या दंडांत समाजधारणेला घातक असें काय आहे ?

**उत्तर:—** आपण माझे विचार योग्य शब्दांत मांडलेले नाहींत. तरीहि मी त्याचा आशय समजूं शकतों. समाजांत राजदंड असूंच नये ही अवस्था आज निर्माण झालेली नाहीं हें उघड आहे. तेव्हां

समाजधारणेला आज राजदंडाची आवश्यकता आहे, असें माझें मत आहे. मात्र असत्यशील व्यक्तींना किंवा अन्यायी व्यक्तींना राजदंडानें शासन करणें ही एक प्रकारची अहिंसाच होय हें मत मला पटत नाहीं. राजदंडाचें शासन जर न्यायानुसारी असेल तर तें मी समाजधारणेसाठीं करावी लागणारी अपरिहार्य हिंसा असें म्हणतों. ही अपरिहार्य हिंसा सुद्धां केवळ आपल्या बळानें समाजधारणा करूं शकणार नाहीं. समाजांत असत्याची व अन्यायाची वृत्तीच वाढूं नये असे प्रयत्न करणारे व तसें आचरण करणारे सत्याग्रही लोक जितके असतील तितक्या मानानें समाजांतलि ही असत्याची व अन्यायाची प्रवृत्ति कमी होईल. पण हें कार्य सत्याग्रहींनीं राजदंड स्वतःच्या हातीं घेऊन होणार नाहीं. त्यांचें कार्य याहून श्रेष्ठ आहे. ज्यांनीं राजदंड हातांत घेतला असेल त्यांना समाजधारणेसाठीं करावी लागणारी हिंसा किमान प्रमाणांत रहावी व ते तत्त्वभ्रष्ट होणार नाहींत यासाठीं जनतेचें आत्मबळ संघटित व प्रभावी बनविणें हें सत्याग्रहींचें कार्य आहे. त्यांनीं समाजधारणेचें हें अहिंसक साधन आपल्या हातीं ठेवून त्याचें सामर्थ्य एकसारखें वाढवीत राहिलें पाहिजे. स्वतः सत्याग्रही जर राजदंड हातीं घेतलि तर ते अहिंसेपासून भ्रष्ट होतीलच पण समाजांतील आत्मबलावरची श्रद्धाहि नष्ट करतील. आणि त्यांच्या हातून घडणारी अपरिहार्य हिंसा हीच अहिंसा या नांवानें प्रतिष्ठितपणें मिरवूं लागेल. असें होण्यांतच समाजधारणेला व समाजाच्या आत्मोन्नतीला निश्चित धोका आहे असें मला वाटतें. म्हणून राजदंडानें केलेलें शासनही हिंसाच; पण ती आज अपरिहार्य आहे, असें म्हणणें इष्ट आहे.

**प्रश्न ७ वाः—** रामराज्य ही कल्पना अस्तित्वांत येणें कधींकाळीं शक्य होईल असें तुम्हांस वाटतें काय ? Complete anarchy कधींकाळीं नांदूं शकेल काय ?

**उत्तर ७ः—** रामराज्य याला आत्मराज्य हें नांव मी पसंत करतों. आत्मराज्य म्हणजे ज्यांत दंडशक्तीची गरजच उरणार नाहीं अशी समाजस्थिति, दंडहीन अवस्था. हा एक अमूर्त असा आदर्श आहे व तो समाजाची पूर्णावस्था दिग्दर्शित करतो. हा आदर्श जरी अव्यक्त व अमूर्त असला तरी तो समाजाच्या प्रगतीची दिशा दाखविणारा आणि उन्नतीचें मोजमाप करण्यास साहाय्य करणारा आहे. ज्या समाजांत राजदंड वारंवार उपयोगांत आणावा लागतो त्यापेक्षां ज्या समाजांत तो क्वचित् उपयोगांत आणावा लागतो तो समाज अधिक उन्नत असें म्हणतां येईल. वास्तववादी दृष्टीनें म. गांधी म्हणतात, "The nearest approach to purest anarchy is democracy based on non-violence" म्हणजे शुद्ध अशा दंडहीन समाजास निकटतम असें साध्य म्हणजे अहिंसाधिष्ठित लोकशाही हेंच होय. अहिंसाधिष्ठित लोकशाही म्हणजेच सत्याग्रही प्रजाधर्मानें नियंत्रित अशी समाजवादी लोकशाही. आत्मराज्य हें ध्येय आहे व सत्याग्रही समाजवादी लोकशाही हें त्याचें मूर्त साध्य आहे असें म्हणतां येईल.

**प्रश्न ८ वाः—**सर्वोदयवादी कमींत कमी गरजा आणि जास्तींत जास्त साधेपणा ही कल्पना ध्येय मानतात असें वाटतें. पण या तत्त्वांचा पुरस्कार करणें आपणांस योग्य वाटतें काय ? या तत्त्वाचा सर्वसामान्य जनतेंत प्रचार करणें आणि त्याची दीक्षा देणें म्हणजे त्याची बुद्धि खुंटविणें नव्हे काय ? या तत्त्वाचा प्रचार करणें मानवाच्या प्रगतीच्या आड येणार नाहीं काय ?

**उत्तर :—** गरजा आणि वासना यांत फरक आहे. मनुष्यानें आपल्या योग्य गरजा भागविल्याच पाहिजेत. योग्य गरजा म्हणजे ज्या भागविल्यानें त्याच्या अंगच्या सर्व शक्तींचा विकास होऊन त्याची उन्नतिच होईल व समाजाची सेवा करण्याचें त्याचें सामर्थ्य वाढेल. अशा गरजा भागविण्याची वासना असावी. उलट ज्या वासना भागविण्याची आपल्या विकासास किंवा समाजाच्या सेवेस गरज नाहीं त्या वासना कमीच केल्या पाहिजेत. राहणीच्या आर्थिक मानाच्या दृष्टीनें बोलावयाचें तर समाजांतील धनिक वर्गाचें राहणीचें मान कमी केलें पाहिजे व निर्धन वर्गाचें राहणीचें मान वाढाविलें

पाहिजे. म. गांधींनीं आर्थिक समतेचें तत्त्व सांगतांना या दोनहि दृष्टींनीं तें सांगितलें आहे व तसेंच आपण केलें पाहिजे. विधायक कार्यक्रमांतलि आर्थिक समतेसंबंधीं ते लिहितात :

" Working for economic equality means abolishing the eternal conflict between capital and labour. It means the levelling down of the few rich in whose hands is concentrated the bulk of the nation's wealth on the one hand, and the levelling up of the semi-starved naked millions on the other."

अशा रीतीनें वरिष्ठ धानिक वर्गाचें राहणीचें मान कमी करणें व कनिष्ठ निर्धन वर्गाचें राहणीचें मान उंचावणें अशा द्विविध प्रकारें हें समतेचें ध्येय उपदेशिलें पाहिजे.

---

## एक नवीन मैत्री

आपण प्रजासत्ताक राज्य स्थापणार, शांततेकरितां प्रयत्न करणार आणि आंतरराष्ट्रीय राजकारणांत स्वतंत्र वृत्ति ठेवणार, हें हिंदुस्थाननें जाहीर केलें असतांनाहि इतर राष्ट्रांनीं हिंदुस्थाननें समान दर्जाचा सदस्य म्हणून राष्ट्रकुटुंबांत रहावें याबद्दल उत्सुकता दर्शविली हें सत्याग्रहशक्तीच्या यशस्वितेचें चिन्ह आहे. कारण जे पक्ष पूर्वी परस्परांविषयीं प्रतिकूल होते त्यांच्यामध्यें स्नेह आणि सदिच्छा प्रस्थापित करीपर्यंत सत्याग्रहाचें खरें साफल्य झालें असें म्हणतां येणार नाहीं. स्नेहाचीं चिन्हें तर दिसत आहेत. यापुढें तो स्नेह वाढून हिंद व दक्षिण आफ्रिका यांमध्यें शांति व सौहार्द उत्पन्न होईल अशी आपण आशा करूं या. ही मैत्री, हा बंधुभाव एका विशिष्ट तऱ्हेचा आहे. यांतील सदस्य परस्परांची शांतिमय प्रगति साधण्याकरितां एकमेकांशीं सहकार्य करतील. परंतु लष्करी योजना किंवा सत्तेच्या राजकारणाकरितां बाढ निर्माण करण्याच्या कामीं एकमेकांना साहाय्य केलेंच पाहिजे असें बंधन या सदस्यांवर नाहीं.

जगांत शांततेच्या कार्यास पाठिंबा द्यायचें हिंदुस्थाननें जाहीर केलें आहे. त्या कामांत त्याला संभाव्य सात सहकारी मिळाले आहेत असें मानतां येईल. त्या कार्यांत हिंदुस्थानला किती प्रगति करणें शक्य आहे हें सर्वस्वीं हिंदुस्थानच्या अंगच्या उत्कटतेवर, कार्यक्षमतेवर, ध्येयवादावर आणि आंतरिक प्रगतीवर अवलंबून आहे. गांधी आणि नेहरू यांची सरणि जर आपण अखंड अनुसरली, तर आपणांस यश मिळण्याचा पुष्कळच संभव आहे.

राष्ट्रकुटुंबांतील राजाच्या स्थानाचें असें वर्णन करतां येईल : हल्लींच्याप्रमाणें इतर सदस्य राष्ट्रांचा तो प्रमुख राहील; हिंदुस्थानचा मात्र प्रमुख रहाणार नाहीं. परंतु राष्ट्रकुटुंब (Commonwealth of Nations) या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या बंधुते-(Fellowship)-चा प्रमुख म्हणून तो स्वीकारला जाईल. उदाहरण देऊन बोलायचें तर राजा आणि हिंदुस्थानचा अध्यक्ष या दोघांमध्यें वडीलकीचा मान राजाला मिळेल. हिंदी अध्यक्षाला ज्याप्रमाणें राष्ट्रकुटुंबांतील इतर सदस्य-राष्ट्रांवर अधिकार रहाणार नाहीं, त्याप्रमाणें राजालाही हिंदुस्थानवर अधिकार असणार नाहीं. आपापल्या घटनांप्रमाणें आपापल्या विशिष्ट क्षेत्रांतच त्यांना आधिकार रहातील.

केवळ शांति आणि अहिंसा यांच्या दृष्टीनें विचार करतां, जुन्या ब्रिटिश राष्ट्रकुटुंबाचा हा नवीन अवतार मला स्वागतार्ह वाटतो.

—श्री. कि. घ. मश्रुवाला, हरिजन ( इंग्रजीवरून )८–५–४९

श्री. र. श. पारखी

# महाराष्ट्रांतील ग्रंथालय-चळवळ

इ. स. १९११ मध्यें महाराष्ट्राचे साहित्य-सम्राट् कै. न. चिं. केळकर यांनीं 'केसरी'त "ज्ञानाचीं सदावर्तें" हा स्फूर्तिदायक अग्रलेख प्रसिद्ध केला; तेव्हांपासून महाराष्ट्रांत मोफत ग्रंथालयें व वाचनालयें यांच्या चळवळीला सुरुवात झाली. इ. स. १९१२ मध्यें पुणें येथील "अनाथ विद्यार्थि-गृहा"चे संस्थापक श्री. वि. गं. केतकर यांनीं "पर्वती मोफत वाचनालया"ची स्थापना केली. ह्या वाचनालयाची आतांपर्यंत स्पृहणीय प्रगति झालेली आहे. श्री. केतकर यांच्या ह्या उपक्रमाचा परिणाम पुण्यांतील त्या वेळच्या कांहीं तरुण मंडळीच्या मनावर विशेष होऊन पुण्यांत हळू हळू मोफत वाचनालयें अस्तित्वांत येऊं लागलीं. त्यांपैकीं श्री. फडणीस यांचें "श्रीराम मोफत वाचनालय", श्री. द. वा. जोशी यांचें "सहकारी वाचनालय" (१९१७), श्री. विनायकराव भुस्कुटे यांचें "महाराष्ट्र मराठी वाचनालय" (१९१८) व श्री. ह. भा देशपांडे यांचें "गणेश मोफत वाचनालय" (१९१९) हीं प्रमुख होत. वरील वाचनालयांपैकीं श्री. हरिभाऊ देशपांडे यांचें "गणेश मोफत वाचनालय" सध्यां चालू असून त्याची बरीच प्रगति झालेली आहे.

श्री. द. वा. जोशी यांनीं सर्व महाराष्ट्रभर मोफत ग्रंथालयें व वाचनालयें उघडण्याचें कार्य अंगावर घेऊन श्री. तात्यासाहेब केळकर, ना. डॉ. जयकर, श्री. बाबासाहेब कामत, सरदार गं. ना. मुजुमदार, प्रा. द. वा. पोतदार व श्री. ग. स. मराठे यांच्या नेतृत्वाखालीं व श्री. घाणेकर, श्री. भोपळे व श्री. देशपांडे यांच्या साहाय्यानें "महाराष्ट्र ग्रंथालय संघा"ची स्थापना इ. स. १९२१ मध्यें केली; व तो संघ स. १८६० चे कायद्याअन्वयें नोंदवून घेतला. या संस्थेमार्फत महाराष्ट्रांतील ग्रंथालयें व पुस्तकालयें यांची पहिली परिषद् त्याच वर्षीं पुणें येथें नेक नामदार डॉ. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. यानंतर दुसरी परिषदहि पुणें येथेंच सन १९२६ मध्यें नामदार केशवराव (दक्षिण हैदराबाद) यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती.

श्री. जोशी यांचे महाराष्ट्रांतील ग्रंथालयांच्या चळवळीचे अविरत प्रयत्न चालू असतात. त्यांनीं इ. स. १९३७ मध्यें रा. ब. एस्. के. बोले यांच्यातर्फे "मुंबई सार्वजनिक ग्रंथालयांच्या कायद्याचा मसुदा" कायदेमंडळापुढें विचाराकरितां ठेवला होता. इ. स. १९३९ मध्यें अहमदनगर येथें जें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन भरलें होतें त्या संमेलनाचा एक भाग म्हणून "ग्रंथालयें व वाचनालयें यांच्या कार्यकर्त्यांची परिषद्" श्री. जोशी यांच्या खटपटीनें भरली होती. त्या परिषदेचे स्वागताध्यक्ष आमदार कुं. सो. फिरोदिया हे होते व अध्यक्ष प्रा. चिं. वि. जोशी हे होते. या परिषदेनें मुंबई सरकार जो 'पुस्तकालय कायद्या'चा मसुदा तयार करीत आहे, त्यांत इष्ट ते फेर सुचविण्याकरितां एक समिति नेमली.

इ. स. १९४० मध्यें नाशिक येथील सार्वजनिक वाचनालयाचा शतसांवत्सरिक उत्सव झाला. त्यानिमित्त त्या वाचनालयाच्या चालकांनीं गेल्या १०० वर्षांतील मराठी वाङ्मयाच्या विकासावर तज्ज्ञांचीं व्याख्यानें करविलीं, व त्या व्याख्यानांचा "प्रदक्षिणा" नांवाचा एक बहुमूल्य ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या ग्रंथांत बडोद्याच्या ग्रंथालय-खात्याचे प्रमुख श्री. त्र्यं. दि. वाकनीस यांचें 'आदर्श ग्रंथालयें' हें महत्त्वाचें व्याख्यान समाविष्ट करण्यांत आलें आहे.

# महाराष्ट्रांतील ग्रंथालय-चळवळ

इ. स. १९४२ मध्यें मुंबईत अखिल भारतीय ग्रंथालय परिषद् भरली होती, त्यावेळीं मुंबई प्रांतांत ग्रंथालयाच्या चळवळीचे प्रयत्न जोमानें चालावेत म्हणून "मुंबई प्रांत ग्रंथालय संघ" स्थापन करण्यांत आला.

इ. स. १९४४, १९४५ व १९४६ ह्या वर्षी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'च्या चालकांनीं मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा यांच्यातर्फे वाचनालयांच्या तीन परिषदा भरविल्या व महाराष्ट्रांतील ग्रंथालयांच्या चळवळीला चांगली चालना दिली. इ. स. १९४५ मध्यें या कार्यकर्त्यांनीं मुंबईस जें अधिवेशन भरविलें त्याचें अध्यक्षत्व पंतप्रधान बाळासाहेब खेर यांनीं स्वीकारलें होतें. 'मराठी ग्रंथालय-संघा'ची स्थापना त्याच परिषदेंत झाली; व तेव्हांपासून या संघाच्या कार्यकर्त्यांनीं महाराष्ट्रांतील मराठी ग्रंथालयांची चळवळ जोमानें चालू ठेवली आहे. त्यांच्या सहकार्यानें इ. स. १९४६ मध्यें कुलाबा जिल्हा वाचनालय संघाची स्थापना झाली.

पुण्यांत दि. १३-५-१९४९ रोजीं जी महाराष्ट्र ग्रंथालय परिषद् भरली होती त्या परिषदेला महाराष्ट्रांतील संस्थांचे ७२ व वैयक्तिक ८५ प्रतिनिधी उपस्थित होते. आतांपर्यंत महाराष्ट्रांत ज्या परिषदा भरल्या, त्या सर्व परिषदांत ही परिषद् बराच प्रातिनिधिक होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या परिषदेचे अध्यक्ष श्री. त्र्यं. दि. वाकनीस यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत मुंबई प्रांतांत ग्रंथालयाचा कायदा करणें किती आवश्यक आहे हें मुद्देसूदपणें प्रतिपादन केलें. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष श्री. भाऊसाहेब हिरे यांनीं आपल्या स्फूर्तिदायक भाषणानें परिषदेचें उद्घाटन केलें व "महाराष्ट्र ग्रंथालया"चे चिटणीस व सम्मेलनाचे कार्याध्यक्ष श्री. दि. वि. काळे यांनीं उद्बोधक व विचारप्रवर्तक स्वागतपर भाषण केलें. ह्या परिषदेनें मुंबई सरकारला एका ठरावानें मुंबई प्रांतांत 'ग्रंथालय कायदा' करण्याची विनंति केलेली आहे व दुसऱ्या ठरावानें 'महाराष्ट्र ग्रंथालय-संघा'ची स्थापना करण्याकरितां एक प्रातिनिधिक समिति नेमलेली आहे. ह्या सम्मेलनाचें सर्व श्रेय पुणे नगर वाचन-मंदिराचे कार्यकर्ते, पुणें ग्रंथालय संघाचे कार्यकर्ते व महाराष्ट्र ग्रंथालयाचे कार्यकर्ते यांना आहे. त्यांच्या पुढाकारानें व खटपटीनें ही महाराष्ट्रांत प्रथमच झालेली अशी प्रातिनिधिक परिषद् पुण्यास भरूं शकली. ह्या सम्मेलनानिमित्त पुणें ग्रंथालय संघानें "ग्रंथ व ग्रंथालयें" ह्या नांवाचा लेखसंग्रहात्मक एक उपयुक्त ग्रंथ व डेक्कन कॉलेज रीसर्च इन्स्टिट्यूटच्या ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. हिंगवे यांचा पुस्तकांचें वर्गीकरण करण्यास विशेष उपयोगाचा असा "इतिहासाचें वर्गीकरण" हा, असे दोन ग्रंथ प्रकाशित केले आहेत. महाराष्ट्र ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. वा.पु. कोल्हटकर यांनींही (१) ग्रंथालयाची व्यवस्था, (२) मराठी ललितवाङ्मयाचें वर्गीकरण, (३) ग्रंथांचें वर्गीकरण, व (४) ग्रंथांचें सूचिकरण अशीं चार उपयुक्त पुस्तकें नुकतींच प्रसिद्ध केलेलीं आहेत. वरील सर्व प्रकाशनें महाराष्ट्रांतील ग्रंथालयांना फार उपयुक्त आहेत.

पुणें ग्रंथालय संघ आपल्या १९३६ सालीं झालेल्या स्थापनेपासून आतांपर्यंत महाराष्ट्रांत ग्रंथालयांच्या चळवळीची जागृति करण्याचें महत्कार्य करीत असून त्या संघाच्या कार्यकर्त्यांच्या उत्साहानें व चिकाटीनें पुण्यांत गेलीं तीन वर्षें "ग्रंथालय-शास्त्राचे शिक्षण-वर्ग" प्रत्येक उन्हाळ्यांत चालविले जातात.

सन्माननीय पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर हे ह्या आपल्या प्रांताच्या ग्रंथालय-चळवळीचा आत्मा आहेत. म्हणूनच त्यांच्या खटपटीनें इ. स १९४६ सालीं मुंबई सरकारनें श्री. र. प. कर्वे यांची मुंबई प्रांतांतील ग्रंथालयांचे मुख्य अधिकारी म्हणून नेमणूक केली. श्री. कर्वे यांनीं हें काम इतक्या आत्मीयतेनें केलें आहे कीं त्यांच्या महत्त्वपूर्ण कामगिरीबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याकरितां दि. १२-५-४९ रोजीं पुण्यांत भरलेल्या 'ग्रंथालय-परिषदे'त सर्व प्रतिनिधींनीं प्राचार्य धनंजयराव गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचा सत्कार केला.

आतां आपल्या महाराष्ट्रांत ग्रंथालय चळवळीला चांगलें स्वरूप प्राप्त होणार अशी खात्री वाटूं लागली आहे. पुण्यांत नुकतेंच स्थापन झालेलें

[पुढील मजकूर पान ७६१ वर पहा

श्री. ह. कृ. मोहनी

# काँग्रेस आणि सर्वोदय

अखिल हिंदुस्थानांत काँग्रेस ही राजकारण करणारी अत्यंत प्रभावशील संस्था आहे व तिला प्रतिस्पर्धी व तुल्यबल अशी दुसरी राजकीय संस्था हिंदुस्थानांत सध्यां तरी अस्तित्वांत नाहीं हें विधान अमान्य होण्यासारखें नाहीं. काँग्रेस संस्थेमध्यें गेल्या दोन अडीच वर्षांपासून हळूहळू परिवर्तन घडून येत आहे; आणि हें परिवर्तन काँग्रेस अधिकारारूढ झाल्यामुळें किंवा स्वराज्यप्राप्तीमुळें अपरिहार्यहि झालें आहे. स्वराज्यप्राप्तीसाठीं परकीय सत्तेशीं विरोध करणें हें काँग्रेसचें मुख्य कार्य स्वराज्यस्थापनेपूर्वी होतें आणि त्यांतच काँग्रेसची स्फूर्ति, शक्ति व महत्त्व सामावलेलीं होतीं.

परकीय सत्ता नष्ट झाली. स्वराज्याची स्थापना झाली. काँग्रेसचें ऐतिहासिक परंपरागत मुख्य कार्य संपलें. आतां काँग्रेसचें विसर्जन करावें अशी विचारसरणी खुद्द महात्मा गांधीजींनींच पुढें मांडली; आणि लोकसेवक–संघांत काँग्रेसचें रूपांतर व्हावें अशी इच्छा आपल्या मृत्यूपूर्वी त्यांनीं प्रकटहि केली. महात्मा गांधीजींच्या मृत्यूनंतर त्यांची ही विचारसरणी त्यांचें अनुयायित्व पत्करणाऱ्या समंजस, चिकित्सक व ध्येयनिष्ठ अशा काँग्रेस पदाधिकाऱ्यांच्या हृदयांत जागृत असणें स्वाभाविक आहे. अवाढव्य विस्तार पावलेल्या काँग्रेसमध्यें गांधीजींची ही अंतिम इच्छा कशी प्रकट करावी ही तळमळ ह्या ध्येयनिष्ठ अशा काँग्रेस पदाधिकाऱ्यांस लागणें योग्यहि आहे. कारण महात्मा गांधी हेच काँग्रेसचे प्राण होते. त्यांनींच काँग्रेसला महत्त्व आणलें. त्यांनींच आपल्या असाधारण राजकारणामुळें काँग्रेसला जागतिक महत्त्व प्राप्त करून दिलें.

सध्यां आपल्या देशांत काँग्रेसबद्दल आत्मीय भाव बाळगणारे तीन श्रेणींचे लोक किंवा कार्यकर्त्यांचे घटक आहेत. राज्यसंस्थेशीं संलग्न झालेले पदाधिकारी आणि कौन्सिलमधून निवडून आलेले काँग्रेसचे सभासद हा काँग्रेसमध्यें समाविष्ट झालेला मुख्य घटक आहे. ह्या राज्यसत्तांतर्गत घटकांशीं ध्येयनिष्ठतेमुळें किंवा सत्ताभिलाषेमुळें विरोध आणि स्पर्धा करणारा व काँग्रेस-संस्थेशीं घनिष्ठ असा संघटनात्मक संपर्क बाळगणारा दुसरा घटक आहे. आणि ह्या दोन्ही गटांशीं सहानुभूति बाळगून महात्मा गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें विधायक कार्यांत रत राहून देशोद्धाराचीं कार्यें स्वतःच्या कुवतीप्रमाणें व मर्यादेप्रमाणें करणारा सेवाप्रिय असा कार्यकर्त्यांचा तिसरा गट आहे. काँग्रेसबद्दल हे तिन्ही प्रकारचे कार्यकर्ते कमी-अधिक प्रमाणांत निष्ठा दाखवीत आहेत.

काँग्रेस ही संस्था विशिष्ट प्रकारच्या राजकारण-विषयक ध्येयवादामुळें प्रभुत्व पावलेली आहे. कोणत्या तरी ध्येयवादाशिवाय कोणत्याहि संस्थेचें प्रभुत्व टिकूं शकत नाहीं. नित्य बदलणारी परिस्थिति लक्षांत घेऊन संस्थेमधील ध्येय तळपत ठेवणें व वाढीस लावणें ह्या क्रियेंतच संस्थेचा विकास, उत्कर्ष व प्रगति अवलंबून असते. काँग्रेसमध्यें सत्तांतर्गत राजकारण परिस्थितीनुसार समाविष्ट करणें अपरिहार्य होतें. ह्या सत्तांतर्गत राजकारणामुळें काँग्रेस-मधील ध्येयवाद झांकला जाणें ही देखील स्वाभाविक अशी घटना आहे. राजकारणांतील सत्तेच्या लोभामुळें काँग्रेससारख्या अवाढव्य व महत्त्व पावलेल्या संस्थेमधील कांहीं महत्त्वाकांक्षी लोकांचीं मनें कलुषित झालेलीं दिसणें ह्यांतहि कांहीं नवल

नाहीं. सत्ता व महत्त्वाकांक्षा ह्या दोन्हीहि ध्येयवादास बाधक आहेत. दोन्ही गोष्टी काँग्रेस-संस्थेंत कांहीं प्रमाणांत आज प्रभुत्व मिरवीत आहेत.

काँग्रेससंस्थेमध्यें सामील झालेले ध्येयवादी लोक पूर्वायुष्यांतील तपश्चर्येमुळें जनमनावर प्रभुत्व मिळविलेले असले, तरी देखील प्रस्तुतच्या अधिकारपदामुळें बदललेल्या परिस्थितींत संस्थेमधील ध्येयवादास उजळा देण्यास ते असमर्थ ठरतात. स्वार्थलोलुप महत्त्वाकांक्षी लोक तर ध्येयवादास मारकच आहेत. काँग्रेसमध्यें महत्त्वाकांक्षी आणि अधिकारी लोकांचें प्राधान्य सध्यां दिसत असल्यामुळें काँग्रेसमध्यें ध्येयवाद जागृत ठेवण्याचें व तो वाढीस लावण्याचें कार्य अत्यंत दुष्कर होऊन बसलेलें आहे. शिवाय हेंहि लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, विध्वंसक कार्यास लागणारा ध्येयवाद आणि विधायक कार्यास उपयोगी पडणारा ध्येयवाद ह्यामध्यें देखील फार फरक आहे. विधायक कार्यें तडीस नेणाऱ्या ध्येयवादास अधिक कणखरपणाची गरज लागते, आणि म्हणून तो अधिक कठीण आहे. काँग्रेस संस्थेंतील विध्वंसक ध्येयवादाचें कार्य आतां संपलेलें आहे. स्वराज्यप्राप्तीनंतर विधायक ध्येयवादाच्या कार्यास आरंभ झालेला आहे.

काँगेस संस्थेचें परिवर्तन ह्या विधायक ध्येयवादाच्या दृष्टीनें होणें शक्य आहे काय ? ह्या प्रश्नाच्या उत्तरावर काँग्रेससंस्थेचें देशव्यापी पुढील प्रभुत्व अवलंबून आहे. काँग्रेसमध्यें सत्ताधिष्ठित राजकारणानें अधिक जागा व्यापलेली आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. काँग्रेस ही देशव्यापी संस्था केवळ एक राजकीय पक्ष बनूं पहात आहे. राजकीय पक्षाचें महत्त्व राजकीय सत्ता निवडणुकीतर्फे काबीज करण्यावर बहुतांशीं केंद्रित झालेलें असतें, आणि ह्या राजकीय सत्तेतर्फे आर्थिक व सामाजिक देशोद्धारक कार्यक्रम अंगीकृत करूनच देशाचा उद्धार मुख्यतः होतो ही विचारसरणी अशा राजकीय पक्षातर्फे अंगीकारण्यांतहि येत असते.

काँग्रेसबद्दल आत्मीय भाव बाळगणारे परंतु सत्ताधिष्ठित राजकारणांतच सर्वस्व न मानणारे असे जे कांहीं थोडे ध्येयवादी तुरळक पदाधिकारी काँग्रेसमध्यें आहेत ते काँग्रेसला विधायक ध्येयवादाचा उजळा देण्याची निष्ठापूर्वक खटपट करीत आहेत. काँग्रेसचें महत्त्वमापन राजकीय पक्ष ह्या दृष्टीनें न होतां, विधायक कार्यामधील ध्येयवादाच्या दृष्टिकोनानें तें महत्त्वमापन व्हावें, असा ह्या काँग्रेसमधील ध्येयवादी पदाधिकाऱ्यांचा कटाक्ष आहे. काँग्रेसची घटना विधायक ध्येयवादाच्या दृष्टीनें नुकतीच बदललेली आहे. काँग्रेसमध्यें कार्यक्षम समासदत्व (Effective membership) निर्माण करण्यांत आलेलें आहे; आणि विधायक कार्याची कसोटी प्रत्येक पदाधिकारावर असणाऱ्या काँग्रेस सभासदास लावली जावी असा बुद्धिपूर्वक प्रयत्न काँग्रेसच्या प्रस्तुत पदाधिकाऱ्यांनीं केला आहे. ह्या प्रयत्नामागील हेतु अगदीं स्पष्ट आहे. विधायक कार्याचें अथवा विधायक ध्येयवादाचें महत्त्व वाढावें, केवळ सत्ताप्राप्तीसाठीं धडपडणारा राजकीय पक्ष ह्या नात्यानें काँग्रेसचें प्रभुत्व जनतेच्या प्रत्ययास येतां कामा नये असा कटाक्ष पूर्वीची घटना बदलविण्याच्या क्रियेंत मुख्यतः दिसून येतो. राजकीय पक्ष ह्या दृष्टीनें काँग्रेसच्या महत्त्वास गौणस्थान देऊन देशोद्धारक विधायक कार्य करणारी देशव्यापी अशी संघटना काँग्रेसनें बनवावी असा काँग्रेस पदाधिकाऱ्यांचा खटाटोप आहे. राजकीय पक्ष ह्या दृष्टीनें देखील काँग्रेसला महत्त्व पुढील काळांत प्राप्त व्हावयाचें असल्यास काँग्रेस ही निष्ठेनें व स्वार्थत्यागानें विधायक कार्य करणारी संघटना आहे असा विश्वास जनतेस पटला पाहिजे. हा विश्वास सत्तेच्या राजकारणातर्फे कौंसिलांतून केवळ चांगले कायदे पास करून उत्पन्न होऊं शकणार नाहीं. महत्त्वाकांक्षी सत्तालोलुप पदाधिकारी जनतेच्या मनावर हें प्रभुत्व निर्माण करण्यास असमर्थ आहेत.

काँग्रेस ही संघटना लोकसेवकांनींच व्यापलेली आहे, असा विश्वास निर्माण करण्यावरच काँग्रेसचें पुढील भवितव्य अवलंबून आहे. काँग्रेसनें निवडणुकीवरच आपली उत्साहशक्ति सर्वस्वीं खर्च न करितां निवडणुकीस गौण स्थान देऊन विधायक ध्येयवादावर आपली मदार ठेवली पाहिजे असा काँग्रेसची घटना बदलविण्यांतील प्रमुख हेतु आहे.

वर काँग्रेसमधील तीन प्रकारच्या घटकांचा उल्लेख केला आहे. कौन्सिलांतून आणि राज्यसंस्थेमध्यें

अधिकारपदें मिळवून कार्य करणारा, काँग्रेस संस्थेमधून कार्यक्षम सभासद ह्या नात्यानें तें कार्य करणारा व केवळ विधायक कार्यांतच रमणारा असे हे तीन वर्ग देशांत आहेत. ह्या तिन्ही वर्गांमध्यें जरी आज सळमिसळ झालेली असली, तरी कार्यक्षम सभासदांचें आणि विधायक कार्यांत सेवारत राहणाऱ्या लोकांचें प्रभुत्व काँग्रेसमध्यें स्पष्टपणानें दृष्टिगोचर झाल्यास सद्यःकालींही काँग्रेसचें वैशिष्ट्य, तिची ध्येयप्रधानता जनतेच्या हृदयांत नवीन परिस्थितींत ठसूं शकेल. आज काँग्रेसचा स्पष्ट असा वैशिष्ट्यपूर्ण स्वभाव ( character ) दृग्गोचर होऊं शकत नाहीं; आणि म्हणूनच काँग्रेसबद्दलचा असंतोष वाढीस लागलेला आहे. कार्यक्षम कार्यकर्त्यांच्या तर्फें काँग्रेसचा विशिष्ट असा ठसा उमटवावा असा उपक्रम करण्यांत आला आहे खरा; परंतु त्याचें स्पष्ट स्वरूप अद्याप दृग्गोचर झालेलें नाहीं.

लोकसेवक-संघांत काँग्रेसचें परिवर्तन व्हावें ह्या महात्मा गांधीजींच्या इच्छेस, काँग्रेसची घटना बदलून आणि कार्यक्षम कार्यकर्त्यांची रचना करून, मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न ज्याप्रमाणें काँग्रेस संघटनेकडून होत आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका दिशेनें ह्या प्रयत्नास पाठिंबा देण्याची खटपट सुरू झालेली आहे. महात्मा गांधीजींच्या मृत्यूनंतर लागलीच सेवाग्रामला सुमारें एक हजार विधायक कार्यकर्त्यांचें संमेलन भरविण्यांत आलें. त्यानंतर एका वर्षानें इंदूरजवळ राऊस दुसरें संमेलन नुकतेंच भरलें. ह्या दोन्ही संमेलनांत गांधीजींच्या दृष्टिकोनानें कार्य करणारे विधायक कार्यकर्तेच एकत्र झालेले होते. ह्या संमेलनांतून निष्पन्न झालेल्या संघटनामधून महत्त्वाचें देशोपयोगी विधायक कार्य होत राहील यांत कांहीं शंका नाहीं. काँग्रेससंघटनेतर्फें होणाऱ्या विधायक कार्यास ह्या सर्वोदयी संघटनांचा पाठिंबा मिळणें साहजिक आहे. कारण काँग्रेसमधील कार्यक्षम कार्यकर्त्यांचें प्रतिज्ञापत्रक पाहिल्यास त्यांत गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें विधायक कार्य करण्याचा आदेश भरून राहिलेला आहे.

कार्यक्षम कार्यकर्त्यांची प्रामाणिक संघटना काँग्रेसला करतां आली आणि सर्वोदय हें नांव घेऊन गांधीजींचें अनुयायित्व पत्करणाऱ्या कार्यकर्त्यांचा मिलाफ ह्या काँग्रेसच्या प्रामाणिक कार्यक्षम कार्यकर्त्यांशीं झाला, तर देशांत विधायक ध्येयवाद निर्माण करणें शक्य होईल; आणि काँग्रेस ही केवळ सत्ताभिलाषी राजकीय पक्ष न राहतां जनतेचा विश्वास संपादन करणारी लोकहितकारक अशी देशसेवकांची ती संघटना बनेल. ही घटना फलद्रूप झाल्यास काँग्रेसबद्दलचा आजचा असंतोष पुष्कळ प्रमाणांत कमी होईल अशी अपेक्षा वाटते.

काँग्रेस ही, राज्यसत्ता प्राप्त करून घेण्यासाठीं निवडणुकी लढविणारा एक प्रभावी राजकीय पक्ष, आणि गांधीजींचें विधायक कार्य करणारा लोकसेवक संघ, ह्या दोन्ही दरडींवर हात ठेवून मार्ग आक्रमण करीत आहे. सर्वोदय समाज या नांवाच्या संघटनेखालीं एकत्र होणाऱ्या विधायक कार्य करणाऱ्या सेवकांचा राजकीय निवडणुकीवर भर असूं शकत नाहीं. तथापि ही सर्वोदयी संघटना काँग्रेसच्या विधायक संघटनेस सर्वस्वीं पोषकच ठरण्यासारखी आहे.

काँग्रेसच्या देशव्यापी संघटनेच्या अशा रीतीच्या विधायक प्रवृत्ती ( trends ) आहेत. आतां महाराष्ट्रांतील काँग्रेसच्या राजकारणाकडे लक्ष दिल्यास सर्वोदयी संघटना आणि काँग्रेस-संघटना ह्यामध्यें शक्य तितका मिलाफ घडवून आणण्याचा उपक्रम येथें जोरानें सुरू झाला आहे असें म्हणण्यास जागा मिळते. सेवाग्रामच्या संमेलनानंतर लागलीच बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखालीं अंबरनाथ येथें सुमारें ४०० विधायक कार्यकर्त्यांचें एक संमेलन भरविण्यांत आलें. आणि राऊस भरलेल्या संमेलनानंतर थोड्याच दिवसांनीं एप्रिल १९४९ मध्यें महाबळेश्वर येथें सुमारे १५०-१७५ काँग्रेस कार्यकर्त्यांचें संमेलन भरलें.

ह्या संमेलनाचा थोडक्यांत निष्कर्ष सांगावयाचा तर असें म्हणतां येईल कीं विधायक कार्यांतील ध्येयवादानेंच श्री. शंकरराव देव व श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं महाबळेश्वर संमेलनाचें वातावरण भरून टाकलें. ह्या संमेलनांत एक महत्त्वाची घोषणा काँग्रेसचे सध्याचे सर-चिटणीस श्री. शंकरराव देव ह्यांनीं केली. कोल्हापूरच्या एका महत्त्वाच्या कार्यकर्त्यानें ह्या संमेलनांत असा प्रश्न विचारला कीं,

काँग्रेसच्या राजकीय पक्षाचें सद्यःकालीन ध्येय काय, त्याचा मार्ग कोणता आणि त्या पक्षाचा कार्यक्रम काय आहे ? त्या कार्यकर्त्यांनीं हे प्रश्न विचारण्यांतील हेतु विशद करतांना सांगितलें कीं राजकीय पक्षाचें ध्येय, धोरण व कार्यक्रम स्पष्टपणें सनापुढें असल्याशिवाय कार्यकर्त्यास काम करतांना हुरूप चढत नाहीं. ह्या प्रश्नास उत्तर देतांना श्री. शंकरराव देव ह्यांनीं ह्या काँग्रेस कार्यकर्त्यांच्या सभेंत जाहीर केलें कीं काँग्रेसचें ध्येय व साध्य सर्वोदय हें आहे; लोकशाही हा काँग्रेसचा मार्ग आहे; आणि गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें विधायक कार्यक्रमाचें अनुसरण करणें हें त्या ध्येयप्राप्तीचें साधन आहे. काँग्रेसच्या कार्यकारिणी-सभेनें ‘संदेश’ म्हणून एक फार महत्त्वाचा ठराव केला आहे. त्यांत गांधीजींचा राजकारणी मार्ग किंवा अहिंसात्मक राजकारण हें काँग्रेसनें आपलें ध्येय ठरविल्याचें घोषित केलें आहे. गांधीजींच्या मृत्यूनंतर वर्किंग कमिटीनें जो आणखी एक ठराव केला आहे त्यांत ‘सर्वोदय’ ह्या प्रतीकात्मक शब्दांतील ध्येयपरता काँग्रेसनें अंगिकारल्याचें स्पष्ट झालें आहे.

काँग्रेसनें अद्याप अधिकृतरीत्या अशा रीतीनें व इतक्या स्पष्टपणानें आपलें ध्येय, धोरण, मार्ग व कार्यक्रम घोषित केलेला नाहीं. पण काँग्रेसनें गांधीजींच्या मृत्यूनंतर त्यांच्याबद्दल व त्यांच्या अहिंसात्मक राजकारणविषयक जे ठराव केले आहेत ते एकत्रित केल्यास श्री. शंकरराव देव ह्यांनीं जाहीरपणानें सांगितलेलें ध्येय, मार्ग व कार्यक्रम ह्यांची निष्पत्ति काँग्रेस ठरावांतून अनुस्यूत झालेली दिसूं शकते. सर्वोदय, लोकशाही व विधायक कार्यक्रम ही त्रयी काँग्रेस-संघटनेनें एकतानतेनें अंगीकृत केल्यास सत्ताविषयक, व पक्षविशिष्ट राजकारण हें काँग्रेसचें वैशिष्ट्य न राहतां अहिंसात्मक लोकशाही आणि ती लोकशाही फलद्रूप करण्यासाठीं विधायक कार्य करणाऱ्या देशसेवकांची संघटना हेंच काँग्रेसचें वैशिष्ट्य ठरतें. काँग्रेस कार्यकर्त्यांनीं ह्या वैशिष्ट्यावर आपली सर्व शक्ति केंद्रित केल्यास नवीन परिस्थितींत जो विधायक ध्येयवाद निर्माण करण्याची आमच्या राष्ट्रास आवश्यकता आहे तो निर्माण होऊं शकेल.

वास्तविक पाहूं जातां अहिंसक समाजरचनेचें साध्य दिग्दर्शित करणारें ‘सर्वोदय किंवा अंत्योदय ( Unto This Last )’ हें जें ध्येय तें ध्येय ज्या समाजव्यवस्थेंत प्रतिबिंबित झालेलें आहे अशी लोकशाही, आणि अशी लोकशाही ज्या सत्याग्रहावर जोर देणाऱ्या विधायक कार्यक्रमामुळें अमलांत येऊ शकते तो विधायक सत्याग्रही कार्यक्रम ही नैतिक आंदोलनाची ( Moral movemeut ) उत्साहवर्धक अशी क्रिया आहे. रूढार्थानें हें राजकारण नाहीं किंवा असें कार्य करणारी संख्या मामुली अर्थानें राजकीय पक्षहि बनूं शकत नाहीं. हें सत्तेचें व अधिकाराचें राजकारण नाहीं; हें जनतेचें नैतिक समुत्थान आहे. गांधीजींनीं ह्याच नैतिक समुत्थानासाठीं आपलें बलिदान केलें आहे. आणि ह्या राष्ट्रपित्याच्या बलिदानास साक्षी ठेवून आपलें विधायक ध्येयवादाचें कर्तव्य करणें हें काँग्रेसचें तरी प्रधान कार्य आहे.

---

( पान ७५७ वरून चालू )

पुणें विद्यापीठ ह्या चळवळीला चांगली चालना देईल यांत शंका नाहीं. ह्या विद्यापिठानें शक्यतों लवकर ग्रंथालयशास्त्राच्या शिक्षणाचे वर्ग पुण्यांत सुरू करणें फार अगत्याचें आहे. कारण आतां जशीं जास्त जास्त ग्रंथालयें स्थापिलीं जाणार तसतशी तज्ज्ञ ग्रंथपालांना मागणी अधिकाधिक येणार. ग्रंथालयांची चळवळ सुदृढ पायावर उभी राहण्यास ग्रंथालयशास्त्रांत निष्णात असलेल्या ग्रंथपालांची संख्या दिवसेंदिवस जास्त वाढावयास पाहिजे. आपल्या ग्रंथालयांची कार्यक्षमता त्यांत काम करणाऱ्या सेवकांच्या कार्यक्षमतेवर अवलंबून आहे.

प्रा. रा. श्री. जोग

# ३२ वें महाराष्ट्र साहित्य-संमेलन, पुणें

आणखी एका साहित्यसंमेलनाचा सोहाळा नुकताच पुणें येथें पार पडला; व ज्यांनीं असे सोहाळे पूर्वी पाहिले होते, त्यांना नेहमींपेक्षां निराळें अथवा न्यून असें वाटण्याजोगें त्यांत कांहीं घडलें नाहीं. अध्यक्षीय निवडणूक, तीविषयीं मतें आणि मतभेद, अध्यक्षांचे सत्कार, स्वागताध्यक्षांचें व अध्यक्षांचें भाषण, विषयनियामक समिति व तीमधील वादसंगर, खुलें अधिवेशन आणि त्यांत पसार होणारे ठराव, साहित्यिकांचा परस्परपरिचय-विधि, साहित्याविषयक कांहीं चर्चा, काव्यगायन व इतर करमणुकीचे कार्यक्रम, समारोपाचीं व आभाराचीं भाषणें, पुढील संमेलनाचें निमंत्रण इत्यादि गोष्टी याहि संमेलनांत झाल्या व नेहमींप्रमाणें हेंहि संमेलन यशस्वी झालें. एकच गोष्ट नवीन होती व ती म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचें हें पाहिलेंच साहित्यसंमेलन होतें. गेल्या वर्षी संमेलन झालें नाहीं व म्हणून स्वातंत्र्याचें दुसरें वर्ष चालू असतांहि यापूर्वी इतर अनेक प्रसंगांविषयीं जसें आपण म्हणत आलों तसें या संमेलनाविषयींहि स्वागताध्यक्षांनीं 'आज स्वतंत्र भारतांत भरणारी ही आपली पहिलीच बैठक आहे' असें म्हणूनहि घेतलें.

कोणत्याहि स्वागताध्यक्षानें संमेलन जेथें भरतें त्या स्थानाचें माहात्म्यवर्णन केलें पाहिजे या रूढ व चिरपरिचित प्रथेस अपवाद न करण्याचें या संमेलनाच्या स्वागताध्यक्षांनींहि ठरवावें हें अगदीं स्वाभाविक होतें. कारण त्या कामास आवश्यक असणारी ऐतिहासिक माहिती म. म. पोतदारांस करतलामलकासारखी स्पष्ट व सुलभ होती, आणि हें काम त्यांनीं आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें चोख बजावलें यांत शंका नाहीं. पण एवढ्यावरच न थांबतां आजच्या जिव्हाळ्याच्या भाषिक प्रश्नासंबंधीचे आपले विचार थोडक्यांत सूत्ररूपानें पण स्पष्टपणें मांडून मराठीचा 'त्रिवार जयघोष' करण्याचें आवाहन केलें.

स्वागताध्यक्षांनीं दिग्दर्शित केलेल्या या प्रश्नाचा विस्तार अध्यक्ष श्री. जावडेकर यांनीं केला असता तर या वर्षीच्या संमेलनाध्यक्षांकडून लोक करीत असलेल्या अपेक्षांपैकीं एक अपेक्षा पूर्ण झाली असती. परंतु तसें झालें नाहीं. अध्यक्षांचीं एतद्विषयक मतें प्रकट झालीं नाहींत किंवा मान्य होण्यासारखीं नव्हतीं असें मुळींच नाहीं. तीं स्पष्ट, योग्य आणि बहुसंख्य मराठी भाषाप्रेमीयांस संमत होण्याजोगींच आहेत. तथापि त्या मताचें सविस्तर उपपादन त्यांच्या हातून झालें नाहीं, व हिंदीच्या अभिमानी व आक्रमक विचारसरणीस रोखठोख व कायमचें असें उत्तर मिळालें नाहीं. हीच स्थिति भाषामूलक पण केवळ भाषिक नव्हे अशा संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाची झाली. याहिबाबत त्यांचीं मतें आजच्या लोकमताशीं मिळतीं व निःसंदिग्ध अशीं दिसलीं. 'महाराष्ट्र, एकच महाराष्ट्र, अखंड व संपूर्ण महाराष्ट्र' हवा असेंच त्यांचें म्हणणें आहे. पण याविषयीं हिरिरीनें, भावनोत्कटतेनें, स्वमतसाधक आणि परमतबाधक असें विस्तृत विवेचन त्यांनीं केलें नाहीं. जणूं काय हें करण्याची आवश्यकताच आज नव्हती; 'निगदेनैव व्याख्यातम्' इतकें हें स्पष्ट आहे. वस्तुतः तें तसें असावयास पाहिजे होतें; पण आजची परिस्थितीच अशी आहे कीं, निर्विवाद गोष्टीहि साधकबाधक प्रमाणांची प्रचंड फळी निर्माण करून गळीं उतरवाव्या लागत आहेत; आणि म्हणून बेळगांवास झालेलें हें काम पुनः एकदां अधिक

हिरिरीनें व्हावयास हवें होतें. त्यानें लोकांचें समाधान झालें असतें. अध्यक्षांनीं सं. महाराष्ट्राच्या साध्याची जोरदार वकिली न करितां शांत, न्यायाधिशी निर्णय दिला आणि पुढें तें साध्य साधण्याच्या शुद्धीवर भर दिला. संयुक्त महाराष्ट्राच्या प्राप्तीचा एकच मार्ग त्यांनीं सुचविला आहे व तो म्हणजे नवीन सरकार निवडून देण्याच्या वेळीं 'आपले जिव्हाळ्याचे प्रश्न सोडविणाऱ्या पक्षास राज्यावर बसवावें' हा होय. पट्टाभि-समितीनें लोकमत प्रभावी करण्याची सूचना दिली आहे. महाराष्ट्राचें लोकमत प्रभावी झालें कीं कचित् काय घडतें याची कल्पना असल्यानें श्री. जावडेकर यांनीं 'सत्याच्या अनत्याचारी आग्रहा'चा आणि 'लोकशाही पद्धतीचा' पुरस्कार व सहेतुक उल्लेख केला असावा. हें आवश्यक होतें हें खरेंच, पण लोकमत प्रभावी करण्याच्या मार्गांचा तपशील त्यांनीं सांगितला असता, तर प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें तें बोधप्रद ठरलें असतें.

जिव्हाळ्याच्या आणि प्रस्तुत अशा या दोन प्रश्नांचें महत्त्व अर्थात् साहित्याच्या व्यवहाराशींच निगडित आहे, आणि साहित्याच्या तात्विक चर्चेपेक्षां आज त्याच्या व्यवहाराबद्दलच लोकांना विशेष आस्था वाटते हेंहि खरें आहे. पण साहित्याचा व्यवहार नसला तरी त्याची तात्विक चर्चा तरी ऐकावयास मिळेल अशा अपेक्षेनेंहि कांहीं साहित्य-प्रेमी संमेलनास आलेले असणें संभवनीय आहे. अध्यक्ष आचार्य जावडेकर यांना साहित्य हें साध्य म्हणून अभिप्रेत नाहीं. जीवनविषयक जी विशिष्ट निष्ठा आपण स्वीकारूं त्या निष्ठेचा जाणून व नेणून पुरस्कार करण्याचें एक साधन म्हणूनच ते त्याकडे पाहतात. साध्य आणि साधन यांचें नेहमींचें सापेक्ष महत्त्व लक्षांत घेतां श्री. जावडेकर यांनीं साधनापेक्षां म्हणजे साहित्यापेक्षां साध्याचा म्हणजे जीवननिष्ठेचा विचार अधिक करणें ही गोष्ट अपेक्षितच म्हणावयास हवी. यांत आनुषंगिकपणें संतांच्या व केशवसुतांच्या काव्याचा त्यांनीं जो परामर्श घेतला तोच काय तो या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांनीं घेतलेला साहित्यपरामर्श होय. या भाषणाचा बराच भाग ऐकत असतां तें एखाद्या सामाजिक वा तत्त्वज्ञान परिषदेच्या अध्यक्षांचें भाषण असावें असा भास होत होता. नाहीं म्हणावयास भक्तिरस व शांतरस यांबरोबर क्रांतिरसाचाहि उल्लेख करून रसविषयक अस्थिर परिभाषेंत आणखी एका शब्दाची भर त्यांनीं घातलेली दिसली. हा क्रांतिरस म्हणजे प्रक्षोभरस नव्हे हेंहि त्यांनीं आपल्या तोंडीं भाषणांत लगोलग सांगून टाकलें. या क्रांतिरसांत भक्तिरस आणि शांतरस हेहि येतात, अशी ग्वाही त्यांनीं दिली. पण या आपल्या नवीन मताचा सोदाहरण ऊहापोह इतर चर्चेच्या दडपणाखालीं त्यांना करितां आला नाहीं. जविनाच्या निष्ठेविषयींचें त्यांचें विवेचन सांगोपांग व सुसंगत आणि त्यांच्या विद्वत्तेविषयीं, व्यासंगाविषयीं व कळकळीविषयीं खात्री पटविणारें झालें आहे असेंच म्हणावें लागेल. परंतु जीवनाची सत्याग्रही समाजवादी निष्ठा साहित्याच्या व्यवहारांत प्रत्यक्षपणें कशी प्रगट करावयाची किंवा उतरवावयाची याचें सोदाहरण स्पष्टीकरण करावयाचें राहून गेलें. त्यामुळें तत्त्व कळलें असें एक वेळ म्हणतां येईल; पण त्याचा व्यवहार कसा करावयाचा याची अडचण शिल्लक उरतेच.

अध्यक्षीय भाषण म्हणजे संमेलनाचें विचारांचें अंग असलें तर खुल्या अधिवेशनांतील ठराव म्हणजे त्याचें व्यावहारिक अंग होय. हें व्यवहाराचें अंग या वर्षी मुळींच वादग्रस्त नव्हतें. संयुक्त महाराष्ट्र, पुणें विद्यापीठ, मराठीकरितां स्वतंत्र नभोवाणी केंद्र, प्रांत–भारती, मराठीचा शिक्षणाचें माध्यम म्हणून उपयोग, इत्यादींविषयीं जे ठराव झाले ते कालोचित आणि पूर्वी कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत होऊन गेलेले असले तरी पुनः होणें आवश्यक असेच होते. त्यांत मतभेद नव्हते. क्वचित् शब्दयोजनेबाबत विसंवाद असला तरी आशयाच्या दृष्टीनें निरपवाद असेच हे ठराव झाले. म्हणून भाषणें अशीं २–३ ठरावांवरच झालीं व इतर ठराव अध्यक्षांनींच पुढें मांडून संमत करून घेतले. लोकशाही कारभाराच्या दृष्टीनें ही दुसरी गोष्ट कित्येकांस रुचली नसली तरी कामाच्या उरकाच्या दृष्टीनें तें इष्टच झालें. त्यांतील नभोवाणीविषयक ठरावाचा पुनरुच्चार व्हायला आणि पुणें केंद्राच्या पूर्वचौकशीची बातमी येण्याला गांठ पडल्यानें काकतालीय न्यायानें कां होईना, तद्विषयक ठरावाच्या अंमल-

प्रा. रा. श्रीं. जोग

# ३२ वें महाराष्ट्र साहित्य-संमेलन, पुणें

आणखी एका साहित्यसंमेलनाचा सोहाळा नुकताच पुणें येथें पार पडला; व ज्यांनी असे सोहाळे पूर्वी पाहिले होते, त्यांना नेहमींपेक्षां निराळें अथवा न्यून असें वाटण्याजोगें त्यांत कांहीं घडलें नाहीं. अध्यक्षीय निवडणूक, तींविषयीं मतें आणि मतभेद, अध्यक्षांचे सत्कार, स्वागताध्यक्षांचें व अध्यक्षांचें भाषण, विषयानियामक समिति व तींमधील वादसंगर, खुलें अधिवेशन आणि त्यांत पसार होणारे ठराव, साहित्यिकांचा परस्परपरिचय-विधि, साहित्याविषयक कांहीं चर्चा, काव्यगायन व इतर करमणुकीचे कार्यक्रम, समारोपाचीं व आभाराचीं भाषणें, पुढील संमेलनाचें निमंत्रण इत्यादि गोष्टी याहि संमेलनांत झाल्या व नेहमींप्रमाणें हेंहि संमेलन यशस्वी झालें. एकच गोष्ट नवीन होती व ती म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचें हें पाहिलेंच साहित्यसंमेलन होतें. गेल्या वर्षी संमेलन झालें नाहीं व म्हणून स्वातंत्र्याचें दुसरें वर्ष चालू असतांहि यापूर्वी इतर अनेक प्रसंगांविषयीं जसें आपण म्हणत आलों तसें या संमेलनाविषयींहि स्वागताध्यक्षांनीं 'आज स्वतंत्र भारतांत भरणारी ही आपली पहिलीच बैठक आहे' असें म्हणूनहि घेतलें.

कोणत्याहि स्वागताध्यक्षानें संमेलन जेथें भरतें त्या स्थानाचें माहात्म्यवर्णन केलें पाहिजे या रूढ व चिरपरिचित प्रथेस अपवाद न करण्याचें या संमेलनाच्या स्वागताध्यक्षांनींहि ठरवावें हें अगदीं स्वाभाविक होतें. कारण त्या कामास आवश्यक असणारी ऐतिहासिक माहिती म. म. पोतदारांस करतलामलकासारखी स्पष्ट व सुलभ होती, आणि हें काम त्यांनीं आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें चोख बजावलें यांत शंका नाहीं. पण एवढ्यावरच न थांबतां आजच्या जिव्हाळ्याच्या भाषिक प्रश्नासंबंधींचे आपले विचार थोडक्यांत सूत्ररूपानें पण स्पष्टपणें मांडून मराठीचा 'त्रिवार जयघोष' करण्याचें आवाहन केलें.

स्वागताध्यक्षांनीं दिग्दर्शित केलेल्या या प्रश्नाचा विस्तार अध्यक्ष श्री. जावडेकर यांनीं केला असता तर या वर्षीच्या संमेलनाध्यक्षांकडून लोक करीत असलेल्या अपेक्षांपैकीं एक अपेक्षा पूर्ण झाली असती. परंतु तसें झालें नाहीं. अध्यक्षांचीं एतद्विषयक मतें प्रकट झालीं नाहींत किंवा मान्य होण्यासारखीं नव्हतीं असें मुळींच नाहीं. तीं स्पष्ट, योग्य आणि बहुसंख्य मराठी भाषाप्रेमीयांस संमत होण्याजोगींच आहेत. तथापि त्या मताचें सविस्तर उपपादन त्यांच्या हातून झालें नाहीं, व हिंदीच्या अभिमानी व आक्रमक विचारसरणीस रोखठोक व कायमचें असें उत्तर मिळालें नाहीं. हीच स्थिति भाषामूलक पण केवळ भाषिक नव्हे अशा संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाची झाली. याहिबाबत त्यांचीं मतें आजच्या लोकमताशीं मिळतीं व निःसंदिग्ध अशीं दिसलीं. 'महाराष्ट्र, एकच महाराष्ट्र, अखंड व संपूर्ण महाराष्ट्र' हवा असेंच त्यांचें म्हणणें आहे. पण याविषयीं हिरिरीनें, भावनोत्कटतेनें, स्वमतसाधक आणि परमतबाधक असें विस्तृत विवेचन त्यांनीं केलें नाहीं. जणूं काय हें करण्याची आवश्यकताच आज नव्हती; 'निगदेनैव व्याख्यातम्' इतकें हें स्पष्ट आहे. वस्तुतः तें तसें असावयास पाहिजे होतें; पण आजची परिस्थितीच अशी आहे कीं, निर्विवाद गोष्टींहि साधकबाधक प्रमाणांची प्रचंड फळी निर्माण करून गळीं उतरवाव्या लागत आहेत; आणि म्हणून बेळगांवास झालेलें हें काम पुनः एकदां अधिक

हिरिरीनें व्हावयास हवें होतें. त्यानें लोकांचें समाधान झालें असतें. अध्यक्षांनीं सं. महाराष्ट्राच्या साध्याची जोरदार वकिली न करितां शांत, न्यायाधिशी निर्णय दिला आणि पुढें तें साध्य साधण्याच्या शुद्धीवर भर दिला. संयुक्त महाराष्ट्राच्या प्राप्तीचा एकच मार्ग त्यांनीं सुचविला आहे व तो म्हणजे नवीन सरकार निवडून देण्याच्या वेळीं 'आपले जिव्हाळ्याचे प्रश्न सोडविणाऱ्या पक्षास राज्यावर बसवावें' हा होय. पट्टाभि-समितीनें लोकमत प्रभावी करण्याची सूचना दिली आहे. महाराष्ट्राचें लोकमत प्रभावी झालें कीं क्वचित् काय घडतें याची कल्पना असल्यानें श्री. जावडेकर यांनीं 'सत्याच्या अनत्याचारी आग्रहा'चा आणि 'लोकशाही पद्धतीचा' पुरस्कार व सहेतुक उल्लेख केला असावा. हें आवश्यक होतें हें खरेंच, पण लोकमत प्रभावी करण्याच्या मार्गांचा तपशील त्यांनीं सांगितला असता, तर प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें तें बोधप्रद ठरलें असतें.

जिव्हाळ्याच्या आणि प्रस्तुत अशा या दोन प्रश्नांचें महत्त्व अर्थात् साहित्याच्या व्यवहाराशींच निगडित आहे, आणि साहित्याच्या तात्त्विक चर्चेपेक्षां आज त्याच्या व्यवहाराबद्दलच लोकांना विशेष आस्था वाटते हेंहि खरें आहे. पण साहित्याचा व्यवहार नसला तरी त्याची तात्त्विक चर्चा तरी ऐकावयास मिळेल अशा अपेक्षेनेंहि कांहीं साहित्य-प्रेमी संमेलनास आलेले असणें संभवनीय आहे. अध्यक्ष आचार्य जावडेकर यांना साहित्य हें साध्य म्हणून अभिप्रेत नाहीं. जीवनाविषयक जी विशिष्ट निष्ठा आपण स्वीकारूं त्या निष्ठेचा जाणून व नेणून पुरस्कार करण्याचें एक साधन म्हणूनच ते त्याकडे पाहतात. साध्य आणि साधन यांचें नेहमींचें सापेक्ष महत्त्व लक्षांत घेतां श्री. जावडेकर यांनीं साधनापेक्षां म्हणजे साहित्यापेक्षां साध्याचा म्हणजे जीवननिष्ठेचा विचार अधिक करणें ही गोष्ट अपेक्षितच म्हणावयास हवी. यांत आनुषंगिकपणें संतांच्या व केशवसुतांच्या काव्याचा त्यांनीं जो परामर्श घेतला तोच काय तो या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांनीं घेतलेला साहित्यपरामर्श होय. या भाषणाचा बराच भाग ऐकत असतां तें एखाद्या सामाजिक वा तत्त्व-ज्ञान परिषदेच्या अध्यक्षाचें भाषण असावें असा भास होत होता. नाहीं म्हणावयास भक्तिरस व शांतरस यांबरोबर क्रांतिरसाचाहि उल्लेख करून रसविषयक अस्थिर परिभाषेंत आणखी एका शब्दाची भर त्यांनीं घातलेली दिसली. हा क्रांतिरस म्हणजे प्रक्षोभरस नव्हे हेंहि त्यांनीं आपल्या तोंडीं भाषणांत लगोलग सांगून टाकलें. या क्रांतिरसांत भक्तिरस आणि शांतरस हेहि येतात, अशी ग्वाही त्यांनीं दिली. पण या आपल्या नवीन मताचा सोदाहरण ऊहापोह इतर चर्चेच्या दडपणाखालीं त्यांना करितां आला नाहीं. जविनाच्या निष्ठेविषयींचें त्यांचें विवेचन सांगोपांग व सुसंगत आणि त्यांच्या विद्वत्तेविषयीं, व्यासंगाविषयीं व कळकळीविषयीं खात्री पटविणारें झालें आहे असेंच म्हणावें लागेल. परंतु जीवनाची सत्याग्रही समाजवादी निष्ठा साहित्याच्या व्यवहारांत प्रत्यक्षपणें कशी प्रगट करावयाची किंवा उतरवावयाची याचें सोदाहरण स्पष्टीकरण करावयाचें राहून गेलें. त्यामुळें तत्त्व कळलें असें एक वेळ म्हणतां येईल; पण त्याचा व्यवहार कसा करावयाचा याची अडचण शिल्लक उरतेच.

अध्यक्षीय भाषण म्हणजे संमेलनाचें विचारांचें अंग असलें तर खुल्या अधिवेशनांतील ठराव म्हणजे त्याचें व्यावहारिक अंग होय. हें व्यवहाराचें अंग या वर्षीं मुळींच वादग्रस्त नव्हतें. संयुक्त महाराष्ट्र, पुणें विद्यापीठ, मराठीकरितां स्वतंत्र नभोवाणी केंद्र, प्रांत–भारती, मराठीचा शिक्षणाचें माध्यम म्हणून उपयोग, इत्यादींविषयीं जे ठराव झाले ते कालोचित आणि पूर्वीं कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत होऊन गेलेले असले तरी पुनः होणें आवश्यक असेच होते. त्यांत मतभेद नव्हते. क्वचित् शब्दयोजनेबाबत विसंवाद असला तरी आशयाच्या दृष्टीनें निरपवाद असेच हे ठराव झाले. म्हणून भाषणें अशीं २–३ ठरावांवरच झालीं व इतर ठराव अध्यक्षांनींच पुढें मांडून संमत करून घेतले. लोकशाही कारभाराच्या दृष्टीनें ही दुसरी गोष्ट कित्येकांस रुचली नसली तरी कामाच्या उरकाच्या दृष्टीनें तें इष्टच झालें. त्यांतील नभोवाणीविषयक ठरावाचा पुनरुच्चार व्हायला आणि पुणें केंद्राच्या पूर्वचौकशीची बातमी येण्याला गांठ पडल्यानें काकतालीय न्यायानें कां होईना, तद्विषयक ठरावाच्या अंमल-

बजावणीस आपोआपच प्रारंभ झाला. संमेलनानें संमत केलेल्या ठरावाच्या अंमलबजावणीला इतक्या लवकर प्रारंभ झाल्याचें हें पाहिलेंच दृश्य म्हणावें लागेल. नभोवाणीविषयक ठराव आधीं झालेच नव्हते असें मात्र नाहीं.

मुख्य संमेलनांत न राखली गेलेली साहित्याची बूज संमेलनाचें एक उपांग जें कविसंमेलन त्यांत चांगली राखली गेली ही एक समाधानाची बाब आहे. कविसंमेलनाच्या अध्यक्षीय निवडीबाबत जी परवड झाली, तीमुळें कांहींसा विनोद निर्माण झाला असला, तरी त्या संमेलनाचे स्वागताध्यक्ष आणि अध्यक्ष या दोघांनींहि आपण साहित्यसंमेलनास आलों आहों ही भावना श्रोत्यांत उत्पन्न केली यांत संशय नाहीं. स्वागताध्यक्ष श्री. घाटे यांनीं गेल्या चाळीस वर्षांतील काव्याचें विहंगावलोकन करून 'रविकिरण-मंडळा'च्या कामगिरीची माहिती करून दिली. ते स्वतः रविकिरण-मंडळाचे एक सभासद असल्यानें हें काम त्यांना अधिकृतपणें करतां आलें. आजकालच्या काव्याविषयींचा त्यांचा इषारा काल-बाह्य होण्याच्या आधींच दिला गेला असल्यानें स्वागतार्ह असला, तरी त्यांना वाटतें तितकें आजचें काव्य निराशाजनक नाहीं. 'अलीकडील बरीच कविता क्षणचित्रात्मक आहे' याबद्दल त्यांना जें दुःख आज होत आहे, त्याच्याशीं सदृश असें दुःख केशवसुतोत्तर काव्याविषयीं, म्हणजे ज्या परंपरेंत रविकिरण-मंडळाचें कार्य झालें त्या परंपरे-विषयीं जुन्या काव्यभक्तांस होई हें विशेष लक्षांत घेण्याजोगें आहे. 'नवीन कविते'चा 'कॅन्व्हस्' भव्य नाहीं अशी जुन्या पंडितांनीं अर्वाचीन कवितेविषयीं केलेली तक्रारच जवळजवळ त्याच शब्दांत करण्याचा प्रसंग नवकवितेच्या एका अनुयायावर यावा हा एक कालानें घेतलेला सूडच म्हणतां येईल. नवीन कवितेच्या एका विशिष्ट प्रकारावर तर त्यांनीं फारच कडक टीका केली. पण कडक टीकेपेक्षां सहानुभूतीनेंच त्याची चर्चा केल्यास त्यामधील जुगुप्साकारक भाग काढून टाकणें शक्य होईल. कडक टीकेनें वा विरोधानें मूळचा विकार दृढ होऊन बसण्याचाच संभव अधिक आहे.

कविसंमेलनाध्यक्ष श्री. रानडे यांनीं आपल्या नियुक्तीविषयीं व आपण काव्यशास्त्रज्ञ नसल्याविषयीं बराच विस्तार करूनहि, आपल्या नेहमींच्या पद्धतीनें, एकाच विचारावर फार वेळ न रेंगाळतां अनेक मार्मिक व सूचक विचार प्रकट केले आहेत. काव्य-विषयक ज्या अनेक विचारांचा निर्देश त्यांनीं आपल्या भाषणांत केला आहे, त्याविषयीं पूर्वीं मुळींच विचार झाला नाहीं असें नाहीं; तथापि अधिक विचारास अर्थात् वाव आहे. या विचारास वा चर्चेस साहाय्य व्हावें एतदर्थ त्यांनीं आपले काव्यविषयक अनेक अनुभव सांगितले आहेत. केवळ विचारप्रधान अशा काव्यचर्चेपेक्षां अनुभूतींचें महत्त्व अधिक आहे हें लक्षांत घेऊन केलेली काव्यचर्चा केव्हांहि अधिक यथार्थ होईल. त्या दृष्टीनें श्री. रानडे यांचें भाषण विचारप्रवर्तक झालें. कविसंमेलनांत दोन गुर्जर कवींचा प्रत्यक्ष परिचय झाला; हा त्या संमेलनाचा एक महत्त्वाचा नवीन विशेष गणावयास हवा. नवीन काव्याविषयीं झालेली चर्चा मात्र अत्यंत विषम व अपुरी झाली. रविकिरण-मंडळाचा गौरव करण्यांत आला ही गोष्ट उचित अशीच झाली; तथापि त्यास मिळालेला वेळ पुरेसा नव्हता व ज्या पद्धतीनें तो करण्यांत आला ती पद्धति अगदीं तांत्रिक अशी झाली, तीमध्यें जिव्हाळा उतरला नाहीं. एक आवश्यक कर्तव्य होत असल्याचाच भाग त्यांत अधिक होता. त्याला अर्थात् कारणेंहि होतीं. मंडळाचे दोन सभासद आज हयात नाहींत. एकदोन सभासद आज त्याचे सभासद आहेत कीं नाहींत याबद्दल शंकाच वाटते. ते उपस्थितहि नव्हते. ज्यांच्या सभासदत्वा-विषयीं अशी शंका वाटत नाहीं असे एक कांहीं वैयक्तिक अडचणीमुळें येऊं शकले नाहींत. श्री. लीलाबाई पटवर्धनांच्या निधनाची आठवण ताजीच होती. उपस्थित असलेल्या तीन सभासदां-पैकीं एक त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें 'झोपी गेलेला भागीदार', तर दुसरा जागा असला तरी क्रिया-शील नव्हे. तिसरे, यशवंत हे काय ते खरोखर कार्यकारी असे सभासद सत्कारस्वीकारास उपस्थित होते. तेव्हां गौरव करणारांनाहि एका समर्थ, वैभवारूढ आणि विक्रमोन्मुख कुटुंबाचा गौरव आपण करीत आहोंत अशी भावना असण्यापेक्षां

# ३२ वें महाराष्ट्र साहित्य-संमेलन, पुणें

आज मोडकळीस आलेल्या घराण्याविषयीं त्याच्या भूतकालीन कार्याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्याचें आवश्यक कर्तव्य असल्यासारखें वाटावें हें स्वाभाविक होतें. पण आवश्यक कर्तव्यहि हातून घडत नाहीं असा प्रकार साहित्यव्यवहारांत अनेक वेळां होतो. त्या कर्तव्यच्युतीच्या आक्षेपांतून अंशतः मुक्तता या सत्कारानें झाली एवढें तरी येथें नमूद करण्यासारखें आहे.

गेल्या दोन संमेलनांपासून, सवता सुभा म्हणून नव्हे, पण एक स्वतंत्र उपांग म्हणून स्त्रीवर्गानें चालविलेला चर्चेचा कार्यक्रम या संमेलनांतहि झाला, व इतर कोणत्याहि कार्यक्रमापेक्षां तो अधिक पद्धतशीरपणें व व्यवस्थितपणें चालविण्यांत आला. चर्चेची पातळीहि कांहीं कमी दर्जाची नव्हती. पुरुषवर्ग श्रोतृसमाज म्हणून उपस्थित असला तरीहि स्त्रियांना या वेळीं मोकळेपणा अधिक वाटतो व त्या आपले विचार चांगल्या प्रकारें व्यक्त करूं शकतात व सभासंचलनाची शिस्तहि चांगल्या प्रकारें पाळतात हें यावेळीं दिसून आलें. याच पद्धतीनें स्त्रियांचा कार्यक्रम झाल्यास त्यांना साहित्यसंमेलनांतून आस्थापूर्वक भाग घ्यावासा वाटूं लागेल व पुरुषांच्या बरोबरीनें त्या साहित्यप्रांतांत कार्य करूं शकतील असा विश्वास बाळगण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

सबंध साहित्यसंमेलनाकडेच एक करमणूक म्हणून पाहणारे अनेक लोक साहित्यिकांत सुद्धां आढळतील; मग इतरांची गोष्ट विचारूंच नये ! पण या इतरांना संमेलनाकडे आकृष्ट करण्यास खास करमणूक या नांवानें पुढें करण्यांत आलेला कार्यक्रम साहजिकच अधिक उपयोगी पडतो व संमेलनाची आर्थिक बाजू त्यामुळें सावरली जाते. तसा भरपूर कार्यक्रम या संमेलनांत ठेवलेला होता. मेघराजाच्या प्रसादानें तो साराच अंमलांत येऊं शकला नाहीं ही गोष्ट वेगळी. पण पहिल्या १-२ दिवसांच्या अनुभवानें साहित्यसंमेलनांत त्याचें महत्त्व किती असावें याविषयीं विचार मनांत येतात. अध्यक्षीय भाषणाच्या दिवशीं व दुसरे दिवशीं संयुक्त महाराष्ट्राच्या ठरावाच्या वेळीं रिकाम्या होत असलेल्या खुर्च्यांची संख्या ज्यानें पाहिली असेल व त्याच दिवशीं करमणुकीच्या कार्यक्रमाच्या वेळची गर्दीहि लक्षांत घेतली असेल त्याच्या मनांत उद्वेगाचे विचार आल्यावांचून राहिले नसतील. अध्यक्षीय भाषण सामान्य श्रोतृवर्गाच्या डोक्यावरून जाण्यासारखें होतें हें एक वेळ मान्य केलें, तरी तें तसें जाऊं देण्यास शेवटपर्यंत तीं डोकीं तरी तेथें हजर असावयास नको होतीं काय ? पण हेंहि एक वेळ क्षम्य मानलें तरी संयुक्त महाराष्ट्रासारखा जिव्हाळ्याचा ठराव पुढें असतां अंधाराचा फायदा घेऊन पसार होणारी मंडळी पाहिली तेव्हां 'आम्हांला या प्रश्नाविषयीं खरोखरच कळकळ वाटते काय' असा प्रश्न उभा राहतो. पुढें लगेच होणाऱ्या करमणुकीच्या म्हणजे काव्यगायनाच्या कार्यक्रमास हजर राहतां यावें म्हणून बहुधा पुष्कळ लोकांनीं घराचा मार्ग धरिला असावा. करमणूक आणि महत्त्वाचे भाषिक प्रश्न या विषयींचें लोकांचें हें तारतम्य केवळ हास्योत्पादक राहिलें नसून चीड येणारें होतें. करमणुकीच्या कार्यक्रमांमुळें विषयनियामक समितीच्या बैठकी रात्रीं घेणें शक्य झालें नाहीं. त्या सकाळीं-दुपारीं घेतल्यानें इतर कार्यक्रमांची गळचेपी झाली व सूचित ठराव छापून प्रतिनिधींच्या हातांत देतां आले नाहींत व एकंदरींत साहित्यविषयक कार्यक्रमांस फारच घाई झाली. प्रत्येक वेळीं हा वेळेचा अभाव जाणवला. आलेल्या प्रतिनिधींस एकमेकांचा परिचय करून घेण्यासहि फुरसद लाभली नाहीं.

प्रत्येक साहित्यसंमेलनानंतर माझ्या मनांत येणारा विचार याहि वेळीं आला. साहित्यसंमेलन म्हणजे एक सामाजिक वा राजकीय परिषद् न होतां, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, विज्ञान इत्यादि इतर विद्याविषयक परिषदांप्रमाणें कशी होईल हा तो विचार होय. साहित्यामधील निरनिराळ्या अंगांचीं उपसंमेलनें होऊन त्या त्या अंगाविषयीं आस्था बाळगणाऱ्या लोकांना परस्पर विचारविनिमयानें लाभ व्हावा व साहित्यनिर्मितीस आणि त्याच्या विकासास खरोखरच उपयुक्त असें मार्गदर्शन व्हावें हें साहित्यसंमेलनाचें खरें कार्य होय. असें कार्य वर उल्लेखिलेल्या परिषदांमधून होत असलें तर तें येथेंहि कां होऊं नये ? कन्नड साहित्यपरिषदेमध्यें तें होतें, मग मराठी

साहित्यसंमेलनांत कां होत नाहीं ? कोल्हापूर–बडोदें इत्यादि ठिकाणीं भरलेल्या साहित्य--संमेलनांतून असे उपक्रम करण्यांत आले होते. विद्वानांचे निबंधहि वाचण्यांत आले होते. ही कल्पना लोकांस मान्य नाहीं असेंहि नाहीं हें या वर्षी भरलेल्या एका उपसंमेलनावरूनहि कळून येतें. पण यास अधिक व्यवस्थित स्वरूप येत नाहीं, व छापील भाषणापलीकडे पाठीमागें कांहीं शिल्लक उरत नाहीं. साहित्याचा जीवनाशीं निकट संबंध आहे यामुळें सामाजिक जीवनामधील प्रत्येक तात्कालिक महत्त्वाचा प्रश्न साहित्य संमेलनास ग्रस्त करूं लागला तर आजच्यापेक्षां अधिक कार्य त्याच्या हातून होण्याची शक्यता दिसत नाहीं. पारतंत्र्यांतून स्वातंत्र्यांत आल्यावर तरी ज्या त्या परिषदेस तिची योग्य ती मर्यादा घालून कार्य करूं देण्यास काय हरकत आहे ? कीं यांतील पहिल्याच भागाविषयीं अद्यापि मतभेद आहे ?

---

# "जिजा म्हणे—"!

[एका अप्रकाशित गाथेंतील पान]

"तुका गाई थोर वाणी अभंगाची"
हीं स्तुति तुक्याची मला नको ॥
तुका काय सांगे आपुलें कपाळ
सोडुनी जंजाळ माझ्या डोईं ॥
तुक्याचा अभंग असो कौतुकवाणा
घरीं त्यानें दाणा ना ये माझ्या ॥
तुक्याच्या अभंगीं असोत भक्तिपाठ
भाकरीला पीठ त्यांनीं ना ये ॥
तुका थोर देई परमार्थाचा धडा
संसाराचा गाडा त्यानें नोढे ॥
तुका सांगे थोर वेदांताचें सार
घरचा उसाभार मला पडे ॥
तुक्याचा वाढतो वेदांती प्रपंच
पोरांचा प्रपंच माझ्या पाठीं ॥
तुका ब्रह्मज्ञान साऱ्या जगा सांगे
घरीं माझ्यामागें उठारेटी ॥
तुक्यानें बोलावा खुशाल वेदांत
जोंवरीं घरांत जिजा आहे ॥
म्हणे "तुका म्हणे," काय म्हणे डोंबल!
जिजाऊचे हाल, तिला ठावे ॥
जिजा म्हणे तुका जगालागीं ठीक
जिजाऊचें दुःख जिजा जाणे ॥

—शरचंद्र वामन रानडे, नागपूर.

# मतें आणि मतभेद

## (१) पुरुषोत्तम म्हणजे काय ?

श्री. संपादक, 'नवभारत', पुणें यांस,

"नवभारत"च्या एप्रिल १९४९ च्या अंकांतील "भगवद्गीतेंतील पुरुषोत्तमयोग आणि डॉ. तुळपुळे" हा लेख वाचून मोठी गंमत वाटली. कोणत्याही ग्रंथाचा अर्थ वस्तुस्थितीकडे पाहून त्या वस्तुस्थितीला अनुरूप असा करावा लागतो. असें न केल्यास कसा घोटाळा होतो, तें ह्या लेखावरून स्पष्ट दिसल्यामुळेंच मला ही गंमत वाटली, आणि वाटलें कीं भगवद्गीतेंतील ह्या वचनानें वर्णिलेली वस्तुस्थिति सांगून ह्या वचनाचा खरा अर्थ विद्वान् लोकांपुढें मांडावा. ह्याकरितांच हा लेख लिहीत आहे. कोण चुकला व कोण बरोबर आहे ह्याची शहानिशा करण्याची मला अगदींच गरज वाटत नाहीं, व मी करीतहि नाहीं.

प्रथमतः वस्तुस्थिति वर्णितों. आत्म्याच्या-ब्रह्माच्या चार अवस्था आहेत. जागृति, स्वप्न, निद्रा आणि ब्रह्मज्ञावस्था,—ब्रह्मज्ञावस्थेलाच मांडूक्योपनिषदांत चतुर्थपाद म्हटलें आहे, आणि "एकात्मप्रत्ययसारं" म्हणजे "सर्व जीवांमध्यें एकच आत्मा आहे असा प्रत्ययच ज्याचें सार म्हणजे मुख्य भाग आहे तो" असें त्याचें वर्णन आहे. 'प्रत्यय' हा ब्रह्मज्ञाच्या जागृतींतच असूं शकतो; म्हणून हें वर्णन अद्वैतज्ञाच्या जागृतीचेंच आहे हें उघड आहे. म्हणजेच ब्रह्मज्ञाच्या जागृतीचेंच आहे हें उघड आहे. ह्या अवस्थेला कोणी "तुर्या" असें म्हणतात. भगवद्गीतेंतील द्वितीयाध्यायांत हिला 'ब्राह्मी स्थितिः' असें म्हटलें आहे. छांदोग्योपनिषद्–८, १२. येथें "उत्तमः पुरुषः" हेंच या अवस्थेस नांव देऊन त्या उत्तम-पुरुषाचें वर्णन केलें आहे. त्या वर्णनाचें मराठी भाषांतर मी माझ्या मराठी उपनिषद्भाष्यांत केलें आहे. तें वाचकांच्या माहितीकरितां येथें देतों :

"हे मघवन्, हें शरीर मर्त्य म्हणजे दुःख अनुभवणारें आहेच. तें दुःखानें [मृत्युना] पकडलेलें आहेच, परंतु तें आनंदरूप [अमृतस्य] व शरीराहून भिन्न [अशरीरस्य] अशा आत्म्याचें राहण्याचें ठिकाण आहे.(—उपनिषदांचा उपसंहार, परिच्छेद २८ येथें मृत्यु, मर्त्य आणि अमृत ह्यांचे मी हे अर्थ सिद्ध केले आहेत.—) अर्थात जो शरीरानें युक्त असतो म्हणजे हें शरीरच मी होय असें समजतो तो सुखदुःखांनीं [प्रियाप्रियाभ्यां] पकडलेला असतो म्हणजे सुखदुःखें त्याला सोडीत नाहींत. परंतु जो शरीराशिवाय राहतो [अशरीरं संतं] म्हणजे 'हें शरीर मी नाहीं' असें मानतों त्याला सुखदुःखें स्पर्श करीत नाहींत. (—"अशरीरं" ह्याचा श्री शंकराचार्यहि हाच अर्थ करितात.—)॥ १ ॥. वायु, अभ्र, वीज आणि विजेचा आवाज हे सर्व अशरीर आहेत म्हणजे शरीरें नव्हत; तथापि [तत्] ज्याप्रमाणें ती ह्या आकाशांतून उत्पन्न होऊन [समुत्थाय] आपल्या श्रेष्ठ ज्योतीला म्हणजे अवस्थेला प्राप्त होऊन स्वरूपानें म्हणजे वायु, अभ्र, वीज किंवा विजेचा आवाज ह्या रूपानें प्रगट होतात, ॥ २ ॥ त्याप्रमाणेंच हा जीवात्मा [संप्रसादः] ह्या शरीरांतून उत्पन्न होऊन आपल्या स्वरूपानें म्हणजे ब्रह्मज्ञाच्या जागृतच्या रूपानें प्रकट होतो; तोच उत्तम पुरुष होय. म्हणजे जीवाची अत्यंत श्रेष्ठ अवस्था म्हणजेच भोग्य व स्पृहणीय अवस्था होय. हा उत्तम पुरुष खात [जक्षत्], खेळत, स्त्रियांशीं, यानाशीं, किंवा बांधवांशीं रममाण होत, परंतु ज्याच्याजवळ आत्मा उत्पन्न होतो [उपजनम्] म्हणजे ज्या ज्याशिवाय आत्मा जीवरूपानें आविष्कृत होऊं शकत नाहीं, त्या

ह्या नेहमीं जवळजवळ राहणाऱ्या शरीराची आठवण देखील न करीत म्हणजे 'तें शरीरच मी होय' हा अभिमान टाकून देऊन त्या जगांत सर्वत्र [तत्र] फिरतो [पर्येति]. रथास जोडलेला घोडा [आचरणे युक्तः प्रयोग्यः] जसा अनेक भूमिप्रदेशांतून फिरतो, तसा ह्या शरीरास जोडलेला हा प्राण म्हणजे उत्तम पुरुष अनेक इंद्रियविषयांतून फिरतो. ॥ ३ ॥... ह्या ब्रह्मलोकांत जे हे काम आहेत ते या मनोरूपी दिव्यचक्षूनें पहात तो रमतो, म्हणजे आनंदाचा अनुभव घेतो. (मनानेंच अद्वैत व आनंद मानल्यानें त्यास आनंद होतो. अद्वैतभावनेनें इतर जीव त्यास अनुकूल होऊन त्याचे काम पुरवितात. आणि मी स्वतः आनंदच आहे या भावनेनें त्याचे काम पूर्णच झाले आहेत, असें तो मानतो.) ॥ ५ ॥ ह्याच आत्म्याची सर्व देव म्हणजे शहाणे लोक उपासना करतात आणि त्यामुळेंच त्यांना सर्व लोक म्हणजे चांगल्या अवस्था आणि सर्व काम मिळतात.''

ह्या वचनांत ब्रह्मज्ञानामुळें ज्या जागृतींत आनंदाशिवाय दुसरें कांहींच नाहीं अशा जागृतीचें वर्णन आहे हें स्पष्ट आहे. बृहदारण्यक, ४।३।२०-३३. येथेंहि हीं अवस्था वर्णिली आहे, व तिला परमलोक आणि ब्रह्मलोक हीं नांवें दिलीं आहेत. जो श्रोत्रिय, अवृजिन आणि अकामहत आहे त्याची ही अवस्था असते, असें तेथें म्हटलें आहे. भगवद्गीतेंतहि द्वितीयाध्यायांत—

विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥
एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ

ह्या शब्दांनीं वर्णिली आहे. महात्मा गांधी ह्याच अवस्थेंत होते; श्रीकृष्णहि ह्याच अवस्थेंत होते व याज्ञवल्क्यही ह्याच अवस्थेंत होते. आणि हीच प्राप्तव्य म्हणून उपनिषदें वर्णितात. हीच आत्म्याची सर्वश्रेष्ठ अवस्था होय. हिलाच भगवद्गीतेंतील पंधराव्या अध्यायांत 'पुरुषोत्तम' ह्या शब्दानें वर्णिलें आहे. हें न समजल्यामुळें सर्व घोटाळा झाला आहे.

भगवद्गीतेंतील हीं वचनें समजण्याकरितां दुसरी एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, निद्रा हीच ब्रह्माचें मूळ अविकसित रूप होय असें उपनिषदें मानतात. म्हणून निद्रेपेक्षां श्रेष्ठ असलेली ब्राह्मी स्थिति ब्रह्मापेक्षांहि श्रेष्ठ ठरते. (निद्रा हीच ब्रह्माचें मूळ अविकसित रूप हें छांदोग्योपनिषद्, ६-८ वरून स्पष्ट दिसतें, आणि मांडूक्य ५-६ वरूनही दिसतें.)

आतां इतकी माहिती लक्ष्यांत ठेवल्यानंतर भगवद्गीतेंतील वचनांचा खरा अर्थ समजणें सोपें आहे. तो असाः

'जगांत हे दोन पुरुष म्हणजे अवस्था भोगणारे आहेत. त्यांना क्षर आणि अक्षर म्हणतात. सर्व जीव म्हणजे जागृति भोगणारे ते क्षर, आणि निद्रा भोगणारें ब्रह्म जें सर्वांच्या वर किंवा आरंभीं आहे तें अक्षर. (अक्षर आणि क्षर हीं नांवें देण्याचें कारण असें कीं, ब्रह्मांतून कितीहि जीव बाहेर निघाले तरी ब्रह्म शिल्लकच राहतें. म्हणजे संपून जात नाहीं आणि जीवावस्था जन्मापासून मृत्यूपावेतोंच राहते आणि जन्मापूर्वीं व मृत्यूनंतर ती ब्रह्मांतच विरलेली असते.) तिसराहि एक उत्तम पुरुष परमात्मा नांवाचा आहे. तो त्यावर प्रेम करणाऱ्या, त्याशीं वैर करणाऱ्या व उदासीन—ह्या तीनही प्रकारच्या लोकांत म्हणजे सर्व जीवांत प्रवेश करून म्हणजे 'सर्व जीव मच आहे' असें मानून [आविश्य] त्या सर्व जीवांवर आपली सत्ता चालवून [ईश्वरः] म्हणजेच सर्व जीवांना आपल्या काबूंत ठेवून त्यांचें धारणपोषण करतो [बिभर्ति], व हें करतांनां तो कधींच थकत नाहीं [अव्ययः]. (महात्मा गांधींसारखा जो अद्वैतबुद्धि महात्मा असतो त्याच्या कह्यांत इतर जीव राहतात व तोहि न थकतां त्यांच्या धारणपोषणाकरितां कर्में करीत असतो हें प्रत्यक्षच दिसलें आहे.) मी ज्या अर्थीं जागृति भोगणाऱ्या क्षरापेक्षां वरचढ आहे आणि निद्रा भोगणाऱ्या अक्षरापेक्षांहि वरचढ आहे, —निद्रेंत म्हणजेच मूलब्रह्मांत ज्ञान नाहीं व आनंदहि नाहीं, केवळ दुःखाभावच आहे, केवळ जागृतींत ज्ञान असलें तरी दुःखहि असतें आणि ब्रह्मज्ञावस्थेंत ज्ञानहि असतें व केवळ आनंदच असतो. ह्यावरून पुरुषोत्तमाचें उत्तमत्व म्हणजे श्रेष्ठत्व सिद्ध होतें व कूटस्थ मूलब्रह्म ाहून भिन्नत्वहि

सिद्ध होतें–)त्या अर्थी मी लोकांत व वेदांमध्येंहि पुरुषोत्तम ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. जो मला म्हणजे ह्या पुरुषोत्तमाला बिनचूक जाणतो तोच सर्वज्ञ होतो आणि मला म्हणजे त्या पुरुषोत्तमावस्थेला पोहोंचण्याचा सर्व प्रकारचा प्रयत्न करतो ( भजति सर्वभावेन ). हे निष्पाप अर्जुना, हें गुह्यतम शास्त्र मीं तुला सांगितलें आहे. बुद्धिमान् मनुष्य हें जाणण्यानें कृतकृत्य होतो'.

ह्या पुरुषोत्तमाच्या वर्णनांत जसें " लोकत्रय-माविश्य " हे शब्द योजले आहेत, तसेंच अक्षरज्ञाच्या वर्णनांत " सर्वमेवाविवेश " हे शब्द प्रश्नोपनिषदांत चवथ्या प्रश्नाच्या शेवटीं योजले आहेत. तेथील वाक्य असें आहे : " तदक्षरं वेदयते यस्तु सौम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेश " ( तें अक्षर ब्रह्म जो जाणतो तो सर्वज्ञ व सर्वांमध्यें प्रवेश करतो ). ह्यावरून दिसून येतें कीं, भगवद्-गीतेंतील " आविश्य " या शब्दांनीं घाबरून न जातां तेथील वर्णन ब्रह्मज्ञाचें आहे असें समजावें. अर्थात् पुरुषोत्तम म्हणजे ब्रह्मज्ञ असें ठरतें. ह्याचें भजन करावें असें भगवद्गीता म्हणते. तसेंच मांडूक्यांतहि ( ३।१।१० ) ' तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेत् भूतिकामः'' असें म्हटलें आहे. ह्या खुलाशानें सर्व संशय मिटतील अशी मी आशा करतों.

आपला

**केशव लक्ष्मण दप्तरी**

नागपूर

ता. ६–४–४९

---

# ( २ ) आधुनिक विवाह वैयक्तिक कीं सामाजिक ?

श्री. संपादक ' नवभारत ' यांस,

सा. न. वि. वि.

' नवभारता 'च्या एप्रिल १९४९ च्या अंकांतील पत्रव्यवहारांत प्रा. प्र. रा. दामले यांनीं मार्चच्या अंकांतील माझ्या विवाहविषयक लेखांतील कांहीं विचारांसंबंधीं मतभेद व्यक्त केला आहे. दोन समाजांतील तेढ प्रत्यक्ष प्रचार, प्रहार, आणि अपहार करण्यापर्यंत विकोपाला पोहोंचली असल्यास, प्रेमपूजकांनींहि त्याची दखल घेणें आवश्यक आहे, असें मी प्रतिपादिलें होतें. लेख लिहिण्याच्या काळीं हिंदु-मुसलमानांतील वितुष्ट कमाल मर्यादेला पोहोंचलें असल्यानें, हिंदु-मुसलमान विवाहाचीं उदाहरणें घेऊन सामाजिक जबाबदारीची मीमांसा केली होती.

प्रा. दामले यांना माझ्या प्रतिपादनापैकीं दोन विचार अमान्य आहेत. एक म्हणजे आधुनिक विवाहांतहि समाजविषयक जबाबदारी टाळतां येत नाहीं हा होय; आणि दुसरा, पूर्वकालीन आणि समकालीन घटना लक्षांत घेतां हिंदू वधूनें मुसलमान वर वरण्याचें ठरविल्यास ही जबाबदारी फारच वाढते, हा होय.

व्यक्तिस्वातंत्र्याला आधुनिक विवाहांत प्राधान्य आलें तें अंशतः तरी प्रतिक्रियान्यायानें आलें. हिंदू समाजांत अनेक शतकें व्यक्तीची गळचेपी झाल्यामुळें, व्यक्तिस्वातंत्र्य प्रस्थापिणें हा नवा धर्म ठरला. परंतु निर्भेळ व्यक्तिवाद हें, ' समाज ' अस्तित्वांत आहे तोंवर तरी, आधुनिकत्वाचें एकमेव लक्षण मानतां येणार नाहीं. व्यक्तित्व प्रस्थापित करून पुनः नवीं सामाजिक बंधनें ओळखणें व स्वीकारणें यांतच खरें आधुनिकत्व आहे.

हिंदू समाजांतर्गत भिन्न जातींशीं विवाहसंबंध करतांना व्यक्ति स्वसमाजापासून (जातीपासून) जितकी दूरावेल, त्याहून मुसलमान समाजाशीं विवाहसंबंध केल्यानें अधिक दूरावेल हें ऐतिहासिक आणि परिस्थितिदत्त सत्य आहे. तसें न व्हावें हें प्रा. दामले यांच्या इतकेंच माझेंहि ध्येयस्वप्न आहे. पण आजच्या परिस्थितींतील, आणि विशेषतः सुमारें वर्षापूर्वीच्या परिस्थितींतील या दोन समाजांतील तेढ लक्षांत न घेणाऱ्या वधूला सामाजिक जबाबदारी कळत आहे असें मी म्हणूं शकत नाहीं.

वधूलाच म्हणण्याचें कारण अशा विवाहांत वधूच स्वसमाजाला मुकणें अधिक साहजिक असते.

असे विवाह, म्हणजे हिंदू वधूंचे मुसलमान वरांशीं विवाह, अनिष्ट ठरले नाहींत, असें प्रा. दामले गृहीत धरतात; इतकेंच नव्हे तर या गृहीत सत्यावरून मुसलमान समाजांतील सर्वच व्यक्ती

आक्रमक नसतात हा निष्कर्ष निघतो असें ते म्हणतात. मुसलमान समाजांत सहिष्णु, अनाक्रामक आणि हिंदुसमाजहितैषी व्यक्ती असतात व अलिकडच्या जातीय धुमाळीच्या काळांतहि त्या होत्या, हें मला कोणाहि ऐक्यवादी माणसाइतकेंच मान्य आहे. अशा व्यक्तींचें अस्तित्व केवळ हिंदु वधूच्या स्वीकारानेंच सिद्ध होण्याइतकें दुर्मिळ खास नाहीं. पण सुशिक्षित हिंदू वधू ज्या मुसलमान वराला वरते, तोहि आक्रमक गुंडांपैकींच असतो असें तर कोणीच म्हणत नाहीं. तथापि आजवर झालेले हिंदु-मुसलमान विवाह सुखावह झाले आहेत असें गृहीत धरलें, तरी तो मुसलमान-समाजाच्या अनाक्रमकत्वाचा पुरावा असें प्रा. दामले कसें मानतात, कोण जाणे! हिंदू वधू सुखानें नांदाविणें, आणि हिंदू समाजासंबंधीं आक्रमक धोरण ठेवणें, या दोन गोष्टींत काडीचीहि विसंगति नाहीं. पण शान्तताप्रिय मुसलमानाशीं विवाह केल्यानेंहि हिंदू स्त्री स्वसमाजाला मुकणें आजच्या परिस्थितींत अपरिहार्य आहे कीं नाहीं, हा मुख्य प्रश्न आहे.

आधुनिकत्वामुळें ज्या वधूचें व्यक्तिमत्त्व सौ. अरुणा असफअली यांच्याइतकें स्थिर आणि विकसित झालें आहे, त्या हिंदू समाजाला पारख्या होणार नाहींत. (मुसलमान समाजांत त्यांना कोणतें स्थान मिळेल, हें मी सांगू शकणार नाहीं.) पण महाराष्ट्रांतील दोन गाजलेल्या विवाहांतील वधूंचा स्वसमाजाशीं इतपत संबंध राहिलेला दिसत नाहीं. अलीकडे झालेल्या एका विवाहांतील ब्राह्मण वधूनें विवाहानंतर धर्मांतरहि केलें. हा पुरोगामित्वाचा अगर व्यक्तिस्वातंत्र्याचा विजय म्हणतां येणार नाहीं. प्रेम आणि पुरोगामित्व यांनाच धर्म मानणाऱ्या वधू, उभय जमातींतील 'स्नेहदूतिका' (ॲम्बॅसडर) देखील होऊं शकतील. पण आज मात्र त्या स्वसमाजाला पारख्या झालेल्या दिसत आहेत, आणि दोन समाजांच्या तेढींत अप्रत्यक्षपणें भरच टाकीत आहेत. यांत वैयक्तिक आकर्षणाइतकीच सामाजिक बेजबाबदारी नसती, तर हे विवाह घडून आले असते असें मला वाटत नाहीं. इतका अंध व्यक्तिवाद मी पुरोगामित्वाशीं सुसंगत समजत नाहीं. ज्यांचे राजकीय संबंध तेढीचे आहेत, अशा राष्ट्रांतील स्त्री-पुरुषांच्या विवाहांत पाश्चात्य राष्ट्रेंहि व्यक्तिस्वातंत्र्याचा फारसा आदर करीत असल्याचें दिसत नाहीं.

माझ्या लेखाचा रोख जुनीं बंधनें तोडण्यावर नसून, नवीं बंधनें ओळखण्यावर आणि स्वीकारण्यावर आहे. आणि या दृष्टीनेंच राष्ट्रविरोधी विधर्मीयांपुरता व्यक्तिस्वातंत्र्यवाद बाजूला ठेवावयास सांगितल्यास, त्यांत माझ्या लेखाच्या प्रमुख प्रतिपादनाशीं विसंगत असें कांहीं नाहीं.

प्रा. दामले यांनीं माझ्या लेखांतील एका मुद्दयासंबंधीं मतभेद लिहून कळविण्याची दक्षता घेतली व विचारास चालना दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. इतरहि कित्येक स्त्री-पुरुषांनीं त्या लेखासंबंधींच्या आपल्या प्रतिक्रिया मला तोंडीं व लेखी कळविल्या. एक दोन विद्वान् मित्र त्यासंबंधीं लेख लिहिण्याच्याहि विचारांत आहेत. तथापि माझ्या लेखाचा मुख्य आधार अनेक स्त्रीपुरुषांचें प्रत्यक्ष चारित्र हा असल्यानें, सामान्य संसारी स्त्रीपुरुषांनीं आपले अनुभव त्या लेखांतील विधानांना जुळते आहेत कीं विरोधी आहेत, तें कळविल्यास एक प्रकारची सामाजिक पाहणीच केल्यासारखें होईल.

टिळक-वाडी
पुणें २
१-४-४९

आपला
**श्री. के. क्षीरसागर**

---

# सार संकलन

## (१) साहित्यसंमेलनाच्या विषयनियामक समितींतलि कांहीं विचारप्रवाह

महाराष्ट्र साहित्यसंमेलनाच्या ३२ व्या अधिवेशनाच्या खुल्या सभेंत जे ठराव मंजूर झाले, ते प्रसिद्ध झाले आहेत. त्या व इतर ठरावांसंबंधीं आधीं विषयनियामकसमितींत जी चर्चा झाली व निरनिराळे राजकीय विचारप्रवाह दिसून आले त्यांचा साररूपानें परिचय करून घेणें निःसंशय उद्बोधक आहे.

संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं जो मूळ ठराव विषयनियामक समितींत आला होता, त्यांत केवळ दारकमिशन व पट्टाभिसमिति या दोन्हींच्या निर्णयाबद्दल नापसंती व्यक्त करण्यांत आली होती. परंतु केवळ नापसंती व्यक्त करून न थांबतां हे दोन्हीहि अहवाल हिंदी लोकशाहीच्या प्रगतीची गळचेपी करणारे, बड्या भांडवलदारांच्या हितसंबंधांचें रक्षण करणारे, महाराष्ट्राबद्दल विकृत विधानें करणारे असल्यामुळें या दोन्हीहि समितींच्या अहवालांचा धिक्कार करावा अशी सूचना सभेपुढें आली. ह्यासंबंधीं म. म. द. वा. पोतदार यांनीं असें सुचविलें कीं " धिक्कारामागील भावना जरी न्याय्य व समर्थनीय असली तरी ती स्पष्ट शब्दांत व्यक्त करणें कार्यसिद्धीच्या दृष्टीनें कदाचित् उचित होणार नाहीं. कारण वाटाघाटी करतांना अशा धिक्कारप्रदर्शक शब्दांमुळें शिष्टाईच्या मार्गांत निष्कारण अडचणी उत्पन्न होऊन, कार्यहानि होण्याचा संभव असतो." तरी पण ही उपसूचना बहुमतानें स्वीकारली जाऊन तीसह ठराव खुल्या अधिवेशनापुढें संमत झाला. त्यावर विषयनियामकसमितींत व खुल्या सभेंत भाषण करतांना श्री. नवरे, श्री. पेंडसे वगैरेंनीं हें स्पष्ट केलें कीं, 'धिक्कार करतांना आम्हांला कोणाच्या हेतूवर आरोप करावयाचा नाहीं. या अहवालांचे परिणाम किती निषेधार्ह आहेत हें प्रदर्शित करावयाचें आहे. आम्हांला जर झगडा करावा लागला तर तो जातिधर्मनिरपेक्ष असा लोकशाहीच्या व अहिंसेच्या मार्गानेंच चालवूं." अध्यक्षांनीं दोन्हींहि सभांतील आपल्या समारोपाच्या भाषणांत हें स्पष्ट केलें कीं, "या धिक्कारामागें कोणतेंहि राजकारण नसून, भावनेची तीव्रता प्रगट करण्याचा तो एक मार्ग आहे, संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न आम्हाला जो सोडवावयाचा आहे तो राष्ट्रीय एकतेला भंग न आणतांच सोडवावा असें आमचें मत आहे."

संमेलनाच्या खुल्या अधिवेशनांत असा एक ठराव संमत झाला कीं, साहित्यिकांना साहित्यसंस्थांनीं पारितोषिक द्यावें व त्याकरितां या साहित्यसंस्थांना सरकारनें मदत करावी. विषयनियामक-समितींत या बाबतींत जो मूळ ठराव आला होता, त्यांत सरकारनेंच श्रेष्ठ साहित्यिकाला पारितोषिक द्यावें, असें होतें. त्याला विरोध करतांना विरोधकांनीं असें सांगितलें कीं, सरकारच्या हातीं पारितोषिक द्यायचा अधिकार दिल्यास सरकारकडून स्वपक्षसंवर्धनाकरितां पक्षपात होण्याचा संभव आहे.

आचार्य जावडेकरांनीं चर्चेंत भाग घेऊन असें सुचविलें कीं, " कोणत्या साहित्यिकाला पारितोषिक द्यायचें हा अधिकार साहित्यसंस्थेचा असून तो सरकारला देण्यांत येऊं नये. आपल्या राज्यघटनेच्या मूलतत्त्वांमध्यें 'सरकारनें पदव्या देऊं नये' असें स्पष्ट नमूद करण्यांत आलें आहे. त्यांतील इंगित ओळखून आपण हा पारितोषिकांचाहि हक्क सरकारला न देणें बरें; मग तें कोणतेंहि सरकार असो: नेहरू-सरकार असो, वा जयप्रकाश-सरकार असो वा कम्युनिस्ट सरकार असो."

याशिवाय इतर असे ठराव होते कीं ज्यांवर विषयनियामकसमितींत कांहीं चर्चा होऊन ते परत घेतले गेले. एक ठराव स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर

हे गांधींवधाच्या कटाच्या आरोपामधून निर्दोष सुटल्याबद्दल त्यांच्या अभिनंदनाविषयींचा होता. याबाबतींत कांहीं जणांकडून मतभेद ऐकूं आल्यामुळें अध्यक्षांनीं ठरावाच्या सूचकांना असें सुचविलें कीं, 'साधारणतः वैयक्तिक अभिनंदनाचे असे ठराव एकमतानें पास होणें हें औचित्यास धरून आहे. या ठरावाच्या बाबतींत ज्या अर्थी मतभेद दिसून येत आहेत त्या अर्थीं हा ठराव मागें घेण्यांत यावा ''. परंतु मतभेद काय आहेत तें कळून घेतल्याशिवाय सूचक आपला ठराव परत घेईनात. नंतर जी चर्चा झाली तींत या ठरावाशीं मतभेद दर्शविणारांनीं असें मांडलें कीं, 'खटला राजकीय आहे, साहित्यविषयक नाहीं, तेव्हां असा ठराव साहित्यसंमेलनाच्या कक्षेंत येत नाहीं'. याशिवाय आणखी अनेक विरोधी युक्तिवाद पुढें आले व वातावरण प्रतिकूल असल्याचें दिसून आलें. हे विरोधी सूर दिसून आल्यावर सूचकांनीं आपला ठराव परत घेतला व अध्यक्षांचे आभार मानले. अध्यक्षांनींहि ठराव परत घेतल्याबद्दल सूचकांचे आभार मानले.

सुरक्षा-कायद्याखालीं शाहीर अमर शेख हे नुकतेच पकडले गेले त्याबद्दल सरकारचा निषेध करणारा ठराव सादर करण्यांत आला होता. परंतु कोणत्या गुन्ह्याकरितां ते पकडले गेले याची साधार माहिती मिळण्याची शक्यता नसल्यामुळें अध्यक्षांनीं तो ठराव मांडण्यास परवानगी दिली नाहीं.

यानंतर जो एक ठराव बरीच चर्चा होऊन विषयनियामक-समितीनें तो घेऊं नये असा निर्णय दिला, त्या ठरावांतलि वादग्रस्त भाग असा होताः 'श्रमजीवि जनता युद्धखोर साम्राजवाद्यांच्या कारस्थानाविरुद्ध शांततेसाठीं व लोकसत्तेसाठीं लढत आहे; या शांततेच्या लढ्याचें पुढारीपण आज सोव्हिएट युनिअनकडे आहे; या लढ्यांत सहभागी होणारे साहित्यिक १३-४-४९ रोजीं पॅरिस येथें जमून त्यांनीं असा निर्णय घेतला कीं, या सोव्हिएट नेतृत्वाखालीं चाललेल्या लढ्यांत लढणें हें प्रत्येक साहित्यकांचें कर्तव्य आहे. ह्या निर्णयाला म. सा. संमेलनानें पाठिंबा द्यावा'.

या ठरावावर जी अनौपचारिक चर्चा झाली. तींत आ० जावडेकरांनीं असें सुचाविलें कीं " या ठरावांत केलेल्या विधानासंबंधीं आपणांस साधार माहिती उपलब्ध नाहीं; शिवाय 'सोव्हिएट-नेतृत्वाखालीं' चाललेला लढा आपल्या कक्षेंत येत नसल्यामुळें ठराव सभेपुढें येऊं शकणार नाहीं". एका वक्त्यांनीं तर 'सोव्हिएट नेतृत्व हें साम्राज्यवादी आहे' असें सुचवून तें नेतृत्व आपणांस मान्य नाहीं अशी आपली विरुद्ध भूमिका मांडली. यानंतर ठरावाचे सूचक 'सोव्हिएट नेतृत्वाखालीं' हे शब्द गाळावयास अनुकूल दिसले. या वेळीं आचार्य जावडेकर यांनीं असें सुचाविलें कीं "त्या शब्दांऐवजीं 'हिंदुस्थानच्या नेतृत्वाखालीं' असे शब्द घालण्यांत यावेत; कारण हिंदुस्थाननें आपल्या अभिनव सत्याग्रही तंत्रानें शांततामय लढा चालविण्याचें आपलें सामर्थ्य प्रकट केलें आहे." ही दुरुस्ती मान्य होऊन ठराव संमत होण्याचा संभव उत्पन्न झाला होता. पण शेवटीं हा ठरावच विचारांत घेऊं नये असें विषयनियामक-समितीनें ठरविलें.

वरील माहितीवरून ठरावांच्या मागें राजकीय विचारप्रवाह कसे खेळत होते हें दिसून येईल. या ठरावांवर विषयनियामक समितींत झालेल्या चर्चेचें नियमन व मार्गदर्शन करावयाला आचार्य जावडेकरांसारखा राज्यशास्त्रज्ञ साहित्यिक अध्यक्ष म्हणून लाभला ह्या अभिनंदनीय विशेषाचा उल्लेख केला पाहिजे.

---

## (२) आयर्लंडच्या स्वातंत्र्याविषयीं शॉचे विचार

आयर्लंडनें नुकताच आपला ब्रिटिश कॉमनवेल्थशीं संबंध सोडून दिला आहे. या घटनेवर जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनीं २१-११-४८ रोजीं लेख लिहिला होता; त्यांत त्यांनीं, 'या घटनेचे भविष्यकाळांत कोणते परिणाम होणें शक्य आहे, हा

निर्णय घेतांना आयर्लंडचा पूर्वेतिहास व स्वभाव-वैशिष्ट्यें कशीं दिसून येतात ' याबद्दलचें आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. त्यांच्या म्हणण्याचा सारांश असा आहे :

" आयर्लंडविषयीं एक गोष्ट अगदीं त्रिकालाबाधित अशी आहे. आयर्लंडमध्यें जन्मलेला आणि वाढलेला मनुष्य हा कट्टर आयरिश असतो—मग तो मूळचा ब्रिटिश, स्पॅनिश, डॅनिश, सॅक्सन वगैरे कोणत्याहि रक्ताचा का असेना ! आयर्लंड त्याला आपला करून टाकतें. मी स्वतः आयर्लंडमध्यें २० वर्षें आणि इंग्लंडमध्यें ७२ वर्षें राहिलों आहे. पण पहिलीं वीस वर्षें हींच खरीं आणि प्रभावी आहेत. मी ब्रिटनमध्यें अजूनहि परक्यासारखाच आहे आणि असाच परका म्हणून मरणार !

" आयर्लंडच्या परराष्ट्रीय संबंधांबाबत मात्र कोणतेंहि नक्की विधान करणें कठीण आहे. आयर्लंडचें नवीन अध्यक्ष कोस्टेलो यांचा निर्णय वर्तमानपत्रांतून माझ्या कानावर आदळेपर्यंत मी आपलें असें धरून चाललों होतों कीं, आयर्लंड व इंग्लंड यांचें आपापसांतील संबंध घरमालक आणि भाडेकरी यांसारखे आहेत. घराची दुरुस्ती मालकानें करायची, बिऱ्हाडकरूनें नव्हे ! माझ्या लहानपणीं आयर्लंडवर व्हिक्टोरिया राणीचें राज्य असलें तरी तें केवळ नाममात्र होतें. राणीचा प्रातिनिधि असा एक ब्रिटिश अधिकारी तेथें असे. पण तो देखील पूर्ण आयरिश बनून गेलेला होता. त्याची नेमणूक संपतेवेळची मला आठवण आहे : शेवटीं त्याला निरोप देण्याकरितां तो आणि त्याची बायको यांची थाटानें उघड्या गाडींतून मिरवणूक निघायची; शहरांतून ती मिरवत असतांना त्या बाईला गहिंवरून येऊन ती रडायची ! आयर्लंडमध्यें ती खरी राणी होती. इंग्लंडमध्यें गेल्यावर तिला कोण विचारतो !

" हा कट्टर आयरिशपणा असूनहि आयर्लंडमध्यें ऐक्यभावना होती असें नव्हे. यादवी माजेपर्यंत व कित्येक वेळां ती माजूं नये म्हणूनच आयर्लंडमध्यें सारखीं भांडणें माजत. हे दक्षिणेकडचे, हे उत्तरेकडचे, हा प्रॉटेस्टंट, हा कॅथॉलिक, हा प्रजापक्षाचा, तो राजपक्षाचा हे भेद कधींच मिटले नाहींत. माझे आजोबा इतके कट्टर पक्षाभिमानी होते कीं 'पेपिस्ट' उच्चारल्यावर त्यांची जीभ विटाळल्यासारखी होऊन ते तो शब्द थुंकून टाकीत असत. पण त्यांचीच एक बहीण कॅथॉलिक असून एका मठाची मुख्य होती !

कांहीं इंग्लिश इतिहासलेखकांनीं स्विफ्ट, बर्कले, शेरिडन, यीट्स ह्या महान् ग्रंथकारांचें इंग्लंडशीं सोयर जमविण्याकरितां त्यांना 'ॲंग्लो-आयरिश' बनविलें आहे ! मला देखील त्यांनीं त्या पंक्तींत नेऊन बसविलें आहे हें सांगायला नकोच. परंतु ॲंग्लो—आयरिश अशी जात केव्हांही नव्हती आणि पुढेंही होणार नाहीं ! अर्थात् हें इंग्रज माणसाला समजणें शक्य नाहीं. इंग्रज मनुष्य अमेरिकेंत गेला तर त्याचे बूट झिजून फाटण्यापूर्वीच तो अमेरिकन ( यॅंकी ) बनतो ! इतकें त्याला अमेरिका बदलवून बनवूं शकते ! परंतु अमेरिका आयरिश माणसाला मात्र कधींही अमेरिकन बनवूं शकली नाहीं. अर्थात् ही गोष्ट इंग्रज माणसाला भूषणावह नाहीं असें मला बिलकुल सुचवायचें नाहीं. मला फक्त वंशदृष्ट्या खरी वस्तुस्थिति काय आहे तीच सांगायची आहे. 'आपण म्हणजे परमेश्वराचे लाडके प्रेषितच' अशी आयरिश माणसांची मनांतून इतकी पक्की समजूत असते कीं त्यांत ते हिट्लरलाही हार जाणार नाहींत ! या गोष्टीच्या उल्लेखावरून अर्थात् या त्यांच्या भ्रमाचें मला समर्थन करावयाचें नाहीं. मला इतकेंच दाखवायचें आहे कीं हा भ्रम तर आहेच; अजून चांगलाच पक्का खोल गेलेला असा आहे. आणि मी कितीही शहाणा आणि समजूतदार असलों तरी तो माझ्या ठिकाणींही पण आहे !

परराष्ट्रीय संबंधाविषयीं म्हणाल तर मी जन्मतः ब्रिटिश प्रजाजन असून सरकारदरबारीं परवान्याकरितां मी माझी तीच माहिती दिली आहे. परंतु आयर्लंडचें 'आयरिश फ्री स्टेट' होईपर्यंत मी इंग्रजांचें राष्ट्रगीत चालू असतां कधीं उठलों नाहीं कीं आपली टोपी काढली नाहीं ! आयर्लंडचाहि मी नागरिक आहेच.

" कॉमनवेल्थमधून बाहेर पडण्याची कोस्टेलोची केलेली अकल्पित घोषणा ऐकल्यावर, मला वेडी आशा वाटूं लागली कीं, आपण आतां कोठलेच

नागरिक राहाणार नसल्यामुळें आपणांस कोठेंच कर द्यावा लागणार नाहीं! आयर्लंडच्या बाबतींत कराचा प्रश्नच नव्हता. कारण माझी तेथील सगळी मालमत्ता मी आयर्लंडला देऊन टाकल्यामुळें मला आयर्लंडला कर द्यावा लागतच नाहीं. परंतु इंग्लंड-मध्यें मात्र मजूर–सरकारच्या 'सर-टॅक्स'नीं मी अगदीं भिकारी बनण्याच्या मार्गास लागलों आहे! या 'सर-टॅक्स'ना मजूर–सरकार 'कॅपिटल लेव्ही' म्हणतें आणि त्यामुळें मजूर–पक्षांतील डावा गट 'बनतो' आणि चुप्प बसतो!

"हा कॉमनवेल्थमधून बाहेर पडण्याचा प्रश्न उपस्थित करण्याचें काय अडलें होतें? खरें म्हणजे कॉमनवेल्थचे प्रजाजन म्हणून आमचें सर्वांचें नीट व्यवस्थित चाललें होतें. मला तर असें दिसतें कीं, कोस्टेलो आणि त्याचा गट ह्यांना, 'आपण डी व्हॅलेरापेक्षांही अधिक कडवे आयरिश ज्वलज्जहाल आहोंत, आयर्लंडच्या झालेल्या फाळणीबद्दल आम्हांलाच अधिक त्वेष आहे' असें दाखवायचें असावें! म्हणून त्यांना आपल्यावरील 'राजमुकुट' फेकून देण्याशिवाय दुसरी क्लृप्ति सुचली नाहीं. पण यांत राजाचें काय नुकसान झालें! मुकुट नसला तरी त्याची आपली 'टोपी' तर आहेच! आमच्यासारख्यांची मात्र त्यामुळें अधिकच पंचाईत झाली आहे! या सर्व कारवाईचा अर्थ तरी काय?

"आयर्लंडच्या फाळणीबद्दल माझें मत पूर्वीपासूनच असें आहे कीं, मजूर–चळवळ आयर्लंड-मध्यें जशजशी वाढेल व प्रभावी होईल, तसतसें उत्तरेकडील कारखानदारांचें (नौबंधनाच्या मालकांचें) प्रचंड संख्या असलेल्या कॅथॉलिक शेतकरी समाजाच्या पाठिंब्याशिवाय चालणार नाहीं, आणि मग ते आपोआपच 'आयर' (Eire) ला येऊन मिळतील.

"या फाळणीमुळेंच डी व्हॅलेराला गेल्या महायुद्धांत तटस्थ रहाणें शक्य झालें. नाहींतर पूर्वेकडून इंग्लंडला आणि पश्चिमेकडून अमेरिकेला आयर्लंड व्यापून टाकावें लागलेंच असतें! या बलाढ्य (irresistible) दोस्त राष्ट्रांना उत्तर-आयर्लंडमध्यें लष्करी तळ मिळाले. त्यामुळें आणीबाणीचा प्रसंग टळला. समजा, पुन्हां जर अशी आणीबाणीची युद्धाची परिस्थिति उत्पन्न झाली आणि ह्या वेळीं आयर्लंडचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य शत्रूच्या हल्ल्याच्या ऐन मोक्यावर आहे असें आढळून आलें तर ब्रिटिश सरकारला आयर्लंड पुन्हां जिंकून त्यावर आपलें स्वामित्व प्रस्थापित करणें अपरिहार्य होईल!

"आयर्लंडला असें स्वातंत्र्य प्राप्त करून द्यायची रोजर केसमेंटची खटपट होती; पण त्याला इंग्लंडनें लगेच फाशीं दिलें! त्याला आशा होती कीं बलिष्ठ राष्ट्रांतील मत्सरी स्पर्धेमुळें, आयर्लंडला नेदर्लंडप्रमाणें तटस्थ राहातां येईल. परंतु ही आशा फुकट आहे. मुख्य प्रधानांची परिषद नुकतीच होऊन गेली, त्यांत त्यांनीं कडेकोट लष्करी तयारी करण्याचें सर्वानुमतें ठरविलें आहे. त्यामुळें अशी कांहीं युक्ति निघणें अवश्य आहे, कीं ज्या योगानें इंग्लंड व आयर्लंड यांमधील दुवा पुन्हा सांधला जाऊन आयरिश माणसाला कॉमनवेल्थचें नागरिकत्व मिळूं शकेल. कॉमनवेल्थमधले हे भ्रमिष्ट वेडे नागरिक (privileged lunatics) म्हणून कां होईना, पण नागरिकाचे हक्क आयरिशांना मिळावेत!

"जाउं द्या! मी कशाला उगीच चिंता करीत बसूं? तशी वेळ आली आणि मी जें वर म्हटलें आहे तें घडून आलें तर 'मी पूर्वीं सांगितलें होतें' असें देखील म्हणणार नाहीं!"

---

## वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होता येते.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वीं मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
२९१ शनवार पेठ, पुणें २.

Regd. No. B. 5177